# अरुण काकतकर



श्री. अरुण काकतकर यांचं मनगुंफ़ी हे पहिलं ई पुस्तक प्रकाशित करताना आम्हाला प्रचंड अभिमान वाटतो आहे. अरुण काकतकर हे नांव आता पन्नाशीच्या अलिकडे पलिकडे असणाऱ्या सर्व मराठी माणसांच्या डोळ्यांपुढचं नांव. सत्तर आणि ऐंशीच्या दशकांत दूरदर्शनच्या सुवर्णकाळातले ते निर्माते. प्रतिभा आणि प्रतिमा, गजरा, साप्ताहिकी, किलबिल, बातम्या अशा नुसत्या नावांनीही या पिढीच्या अंगावर रोमांच उभे रहातात. त्यांचे निर्माते अरुण काकतकर. स्मिता पाटिल, लक्ष्मीकांत बेर्डे अशांना पहिला ब्रेक देणारे अरुण काकतकर. पुलं, बाबुजी आणि अण्णा अशी मैफ़ल रंगवणारे अरुण काकतकर; विनय धुमाळे, सुधीर गाडगीळ, समीरन वाळवेकर यांच्या कार्यक्रमांमागचे सूत्रधार अरुण काकतकर, आशाताई, लतादिदींना दूरदर्शनवर लाईव्ह आणणारे अरुण काकतकर; जितेंद्र अभिषेकींच्या सुरांच्या चांद्रचांदण्यात आपल्याला भिजवणारे अरुण काकतकर; आणि आताच प्रकाशित झालेला ढोलताशे या सिनेमाचे दिग्दर्शक अंकुर काकतकर यांचे  पिताश्री अरुण काकतकर हे एक चालतेबोलते सांस्कृतिक केंद्रच आहेत. त्यांचे मुंबईतले घर म्हणजे अनेक मराठी कलाकारांचे मुंबईत उतरण्याचे हक्काचे ठिकाणच होते.

त्यांच्या या पहिल्या ई पुस्तकाचे नांव आहे मनगुंफ़ी. विश्व असीम आहे. असंख्य ग्रह तारकांच्या आकाशगंगा. आणि असंख्य आकाशगंगांचा पसारा, न संपणारा. हे झाले बाहेरचे विश्व. पण मनाच्या गुंफ़ेलाही सीमा नाही. विशेषतः काकतकरांकडे असंख्य़ आठवणी, व्यक्ती,

अनुभव आणि चिंतनांचा एवढा मोठा साठा असणार की त्यांची ही गुंफ़ा सुद्धा बाहेरच्या आकाशगंगेसारखीच तारे तारकांनी समृद्ध असणार. त्यामुळे या गुंफ़ेत आपल्या वाचकांना प्रवेश मिळणार या कल्पनेनेच आम्ही भारावले गेलो आहोत. आनंद माडगूळकर, नीला सत्यनारायण, विनय हर्डीकर, अशा अनेक नामवंतांनी त्यांचे लिखाण गौरवलेले आहे. त्यांची आजवर अनेक पुस्तकं प्रकाशित झाली असून "नक्षत्रांचे दिवस" आणि अनुभवसिद्ध अल्पाक्षरी+ दासबोध-भासबोध ही पुस्तकं अंधांसाठी ब्रेल लिपीमध्येही प्रकाशित झाली आहेत.

दूरदर्शनवर सुमारे पंधरा वर्षे अनेक मालिकांची निर्मिती आणि इतर सेवा केल्यानंतर श्री अरुण काकतकर यांनी दहा वर्षे स्वतःला बालचित्रवाणी मध्ये लहान मुलांचे मनोरंजन करत वाहून घेतले. सध्या ते पुणे येथे दिनानाथ मंगेशकर हॉस्पिटलमध्ये कार्यरत आहेत.

त्यांचे हे पुस्तक आपल्याला कसे वाटले ते 24ak47@gmail.com या त्यांच्या पत्त्यावर कळवावे. तसेच त्यांचे अधिक लिखाण वाचण्यासाठी http://targetpointblank.blogspot.in/ या त्यांच्या ब्लॉगला भेट द्या.

सुनिल सामंत

ई साहित्य प्रतिष्ठान

# अर्पणपत्रिका

जरी या पुस्तकाला लेखक म्हणून माझे नांव असले

तरी मी केवळ निमित्तमात्र, भारवाही

म्हणून हे पुस्तक अर्पण करतो

ज्याने हे विचार सुचवले, हे लिहवून घेतले त्या जगन्नियंत्याला

आणि ज्यांनी हे गोड मानून घेतले त्या माझ्या सुहृद वाचकांना

अरुण काकतकर

# अनुक्रम

# रमेश गोविंद वैद्य

संस्कारानं मित-मृदुभाषी, सहृदय, प्रसन्नचित्त, शिक्षणानं कायदेतज्ज्ञ वकील, व्यवसायानं जाहिरात संकल्पक, लेखक, वृत्तीनं सक्षम कवि-रुबाईकार असा आमचा मित्र रमेश गोविंद वैद्य.. याचा परिचय मला करून दिला, आणखी एका सुहृदानं.. १९८०-८१ मधे बहुधा..

२३, मुकुंद निवास, डी.एल्. वैद्य रोड, दादर, या माझ्या मुंबईतल्या वास्तव्याच्या ठिकाणी, ८० ते ८७ हा सातवर्षांचा कालखंड, आम्ही सर्वांनी श्रवण, दर्शन, घ्राण, रसना आदि ज्ञानेंद्रियांनी, म्हणजे त्वचेचा सहभाग फक्त रोमांच जाणिवेपुरतांच हं.. अक्षरशः भोगलाय! आम्ही म्हणजे कोण माहीत आहे.. आजकालचे सगळे प्रथितयश.. डेबू देवधर, सुधीर मोघे, त्या काळांत माझ्याशी.. कां कुणास ठावकी.. पण खूप जवळीक साधून असलेला, म्हणजे किमान तसं अगदी बेमालूमपणे भासविणारा सुधीर गाडगीळ, अरविंद हसबनीस, चंद्रशेखर गाडगीळ, विलास आडकर आणि शिवानंद पाटील..या यादींतले तीघे आतां हयात नाहीत पण ते लौकीक जगासाठी.. आमच्या मनांत ते रुजलेत, वाढलेंत बहरलेंत आणि बरसलेंत.. शब्द-स्वरांच्या स्नेहमयी वर्षेंत चिंब भिजवीत..

अक्षरशः काव्यशास्त्रविनोदाचं वारं रोज अगदी पंचपंच उषःकाली..म्हणजे थोडक्यांत सगळ्या हस्ती जागृतावस्थेंत येवून माणसांत आल्यावर..वाहायला लागायचं..

मग जाऊन येऊन, सुरेश वैद्य, आनंद मोडक, श्रीकांत पारगांवकर, चंदू काळे, सदानंद चांदेकर अणि पुण्यातले अनेक कलाकार.. उभरते, प्रथितयश.. स..ग्गळे. अगदी आदरणीय, सुप्रसिद्ध, जेष्ठ दिग्दर्शक राजदत्त सुद्धा एका रात्रीचा निवारा घेवून गेलेंत २३ मुकुंद

निवासांत.. आणि विख्यात संगीतकार रामभाऊ कदम.. माझी पेटी घेवून, रात्री ११ ते पहाटे तीन पर्यंत.. लिहायला लागलं तर एक लठ्ठमुठ्ठ कादंबरी होईल या वास्तूवर..

असाच एक 'दिवस' रमेशला घेवून आला आमच्या त्या मठींत.. आणि, उंबरठा ओलांडल्या क्षणापासून रमेश मग आमच्या परिवारांतला एक होवून गेला.

जशी सुधीरनं.. मोघेंच्या हं.. शब्दधून तीथं लिहिली, एका हिंदी चित्रपटासाठी गीतं रचली संगीतबद्ध केली, डेबू नागीण किंवा खानदान च्या छायाचित्रणांत व्यस्त असायचा, चंद्या गाडगीळनं बाकीशब्द आणि कांचनसंध्या स्वरांकित केली, तशाच अनेक रुबाया किंवा अन्य काव्यप्रकारांच्या ज्योती, रमेशनं तिथं उजळल्या पाजळल्या..

त्याच दरम्यान त्याची ही कादंबरी, व्हिक्टोरिया टर्मिनस्, महानगर मधून प्रकाशित होतं होती. सगळयांना एकत्र सवड असेल तेंव्हा तो, क्रमशः प्रसिद्ध होणारं ते लिखाण वाचून दाखवीत असे. 'यह मुंबइ मेरि जान'.. देणारी आणि चुकलांत माकलांत तर घेणारी सुद्धा.. अशा या मायामोहिनीचे नखरें आणि तिच्या त्या गुबगुबींत पंज्यामधे लपलेली नखं.. दोन्हीचं यथार्थ, रोमांचक वर्णन, रमेश ऐकवायचा आणि आम्ही अंतर्मुख व्हायचो.. कारण आमच्यापैकी प्रत्येकजण, पोटार्थी, रोजमरा की जींदगी जगण्याचा एक अविभाज्य भाग म्हणून.. त्या चरकांतून घाम गाळत थकलाभागला घरी.. त्या मठींत येत होतां..त्यामुळं ब-या जवळच्यांच्या जगण्याचा जणू आरसाच असल्याचा भास व्हायचा ऐकतांना..

रमेशला मी कधी, खिन्न, दुःखी, खंतावलेला पाहीलाच नाही इतक्या वर्षांत..कायम हसतमुख, प्रसन्नमुद्रा. पण कधीकधी अंतर्मुख, तंद्री लागलेला मात्र अनेक वेळां पाह्यलय त्या काळांत.. ही तंद्री बहुतांशी अध्यात्मिक भासली मला.. उगा सृजनाचा आव आणलेली कधीच नव्हती ती.. कारण त्याच्या रचना सहजप्रसवा असतांत.. आयुष्याचे चढउतार, अनुभव, निरीक्षणं यांचं शब्दरूप असलेल्या..

या रचनांनी जशी मला भुरळ पडली ,तशीच, एका अतिशय संवेदनशील आणि कवितेच्या शब्दांमधल्या अध्यात्मृताची विलक्षण जाण असणा-या चंद्याला.. चंद्रशेखर गाडगीळलाही पडली आणि रुबायांना अप्रतिम स्वरकोंदणं मिळाली. त्या काळांत, मुंबई

दूरदर्शनची मेट्रोवाहिनी...म्हणजे दुसरा मनोरंजन-स्रोत.. सुरूं झालिवती. त्या वाहिनीसाठी मी या, प्रगल्भ पण उपेक्षित कलाकाराच्या रुबायांवर बेतलेले दोन कार्यक्रम केले.

तसा वरकरणी.. आणि अंतःकरणीसुद्धा खरं तर..अत्यंत साधा सीधा, अगदी लक्ष्मणच्या कॉमन् मॅन इतका, फाटका दिसणारा हा माणूस, स्वरचित रुबाया सादर करायला लागला की, जितक्या अलवारपणे तो एखाद्या छोट्या समूहाला मोहून टाकतो, तितक्याच सहजतेनं, पहिल्या दहा-बारा मिनिटांतच, कुठल्याही जाणकार वयोगटाच्या, पांचशे हजार प्रेक्षकांच्या मनावर अधिराज्य करायला लागतो. आणि मग, रुबाई घाटाला साजेसे विविध विषय, प्रेमापासून प्रेतापर्यंत, भोगापासून वैराग्या पर्यंत, आणि कळ्यांपासून पुतळ्यांपर्यंत, कधी तिरकस फटकेबाजी करीत. कधी निष्ठुर सत्य सांगत आपल्याला अंतर्मुख करतांत, आणि प्रसंगी खळखळून हसायलासुद्धा लावतांत..

हे सगळं आज लिहायचं निमित्त म्हणजे, व्हिक्टोरिया टर्मिनस् चं वाचन होतय.. पुण्यांत. आणि या उपक्रमासाठी शुभेच्छा देण्यासाठी हा शब्दप्रपंच..

हा असाच मित्रा, राहिलं रेशिमबंध
बकुळिच्या प्रमाणे खुलेलं वृद्धसुगंध
देवून मालकी वार्धक्याचि फुलांना
मग नवीन बीजां सांगू 'फळा ! फुलाना !!'
हा मूलस्रोत मिळाला तुझ्याचं संगे
जशि फुलता खुलता रुबाइ नकळत रंगे
हा संगमर्मरी निवांत शब्द-निवारा,
क्षण कसनुशिचे शोधतील मुकाट वारा

आमचा हा आनंदी निरागस, निर्व्याज, निरपेक्ष जिवलग सखा, यंदा त्र्यहात्तरींत प्रवेश करतोय.. या वळणावर त्याला, निरामय आरोग्य, अभिष्ट चिंतून आणखी खूप, गूढार्थी शब्दलेणी, त्याच्याकडून पुढच्या काळांत मिळतील, अशी खात्री बाळगूया

*****

# एका केशकर्तकाच्या आयुष्यांतला एक दिवस...

एक दिवस एक फुलंविक्रेता केशकर्तनालयामधे आला, या नापित महोदयांच्या..केशकर्तनाची क्रिया पूर्ण झाल्यावर, सहाजीकच त्यानं सरसावत, खिशांत हात घालत, ’किती झाले ?’ असा स्वाभाविक प्रश्न विचारला. नापित महोदय, आपले हात मागे घेत आणि मागे सरत उद्गारले, ’नाई नाई मला कांही मोबदला नकोय, कारण मी हा आठवडा ’समाजसेवा-सप्ताह’ म्हणून व्यतीत करणार आहे ! ठेवा तुमचे पैसे तुमच्याच खिशांत परत...’ चेहेऱ्यावर आश्चर्य आणत, पण मनांत सुखावत, फूल-विक्रेत्यानं, खिशांतला हात तसाच ठेवला.

दुसऱ्या दिवशी आपलं दुकान उघडायला गेल्यावर नापिताला दाराशी एक पुष्पगुच्छ आणि एक आभार-पत्र ठेवलेलं मिळालं आणि त्याच्याही चेहेऱ्यावर मंद स्मित झळकलं

नंतर कांही वेळानं एक पोलिसदादा केशसंभार कर्तनार्थ दाखल झाले दुकानांत. परत सगळा प्रसंग, जो आदल्या दिवशी घडला होता त्याची पुनरावृत्ती झाली म्हणजे पोलिसदादानं पैसे काढणं, नापितानं ते नम्रतापूर्वक नाकारत, त्याचं कारण सांगणं वगैरे वगैरे.

पुढल्या दिवशी परत आदल्या दिवशी सारखीच फुलं दाराशी..फक्त एक बदल म्हणजे आज आभार-पत्राबरोबरी एक ताज्या बटाटावड्यांचा पुडाही होता.

त्या दिवशी मग एक ’खासदार’..चक्क..आले डोकं भादरण्यासाठी केशकर्तनालयांत..कर्तनोत्तर परत, ’नाई नाई मला कांही मोबदला नकोय, कारण मी हा आठवडा ’समाजसेवा-सप्ताह’ म्हणून व्यतीत करणार आहे ! ठेवा तुमचे पैसे तुमच्याच खिशांत

परत...’. सुरू झालं नापिताचं पालुपद...’खासदार’ महोदय तत्परतेनं पैसे परत खिशांत कोंबत, शिळेवर एक त्यांच आवडत चित्रपटगीत वाजवत, टणाटण निघाले परतीच्या वाटेनं.

चौथ्या दिवशी सकाळी, सत्कारणार्थ आपल्या ’कर्मभूमी’कडे निघालेल्या नापिताला, लांबूनच दिसलेलं दृश्य बघून तो बुचकळ्यांत पडला...जवळ गेला तो काय ! अहो आश्चर्यम्..

दुकानाबाहेर एक डझनभर खासदार उभे होते ’नापित कधी एकदा येतो आणि दरवाज्याच्या फळ्या उघडतो’ याची वाट पाहात.

तात्पर्य:

मित्रांनो ! हाच तर फरक आहे, सर्वसामान्य भारतीय नागरिक आणि

जनतेला, ’मुकी बिचारी, कुणिही हांका !’ म्हणत आणि त्यांच्या (मतपेटींत खोट्या आश्वासनांनी हुरळून मतं टाकणाऱ्या) भोळसटपणाला हसत त्यांना ’हाकणाऱ्या..भारतीय राजकारण्यांमधला !!

आणि म्हणून शासनकर्ता राजकीय पक्ष, बालकांच्या वारंवार बदलाव्यालागणाऱ्या ’दुपट्या-लंगोटां’प्रमाणेच बदलून, अंगी परिवर्तनवाद बाणवायला पाहिजे आंता आपल्याला...

## 'जोहार मायबाप जोहार'

'जोहार मायबाप जोहार, तुमच्या महाराचा मी महार'

कां कुणास ठावकी पण नव्या वर्षाच्या नांदीचे चौघडे निनादायला लागायच्या सुमारास ह्या ओळींनी, अचानक माझ्या मनांत कां बरं काहूर माजवावं ? 'बालगंधर्व' नारायणराव राजहंस, या संगीत रंगभूमी-सम्राटानं अजरामर करून ठेवलेलं पद..'कान्होपात्रा' या नाटकांतलं (लेखक कै. नारायण विष्णू कुलकर्णी.. ज्यांचा महाजालांतल्या या नाटकाच्या माहितीमध्ये कुठेही उल्लेख नाही पण विभानं ..देशपांडे.. माहिती पुरविली..). हे पद मी बऱ्याचवेळेला, नाट्यसंगीताच्या मैफलीच्या अखेरीस गातांना ऐकलय. आणि सुरावट सुद्धा करुण लागते कानाला. त्यामुळं ती भैरवी असावी किंवा कसे अशी शंका मनांत यायची. तसं सुद्धा कानाला सुखावून जाणारं गाणं, 'कुठल्या रागांतलं बॉ ?' अशी पृच्छा चेहेऱ्यावर घेवून वावरणाऱ्यांचा मला खूप राग येतो. अरे लेको, आनंद घ्या की गाण्याचा.. कशाला त्या व्याकरणाच्या घनदाट जंगलांत घुसता ? पण आज मात्र या नव्या सदराचा प्रपंच मांडतांना, आपल्या लिखाणांतून, जर कांही माहिती मिळणारचं असेल माझ्या, 'मायबाप' वाचकांना तर ती शक्यतो अचूकच असायला हवी म्हणून मीही आज त्या 'जंगला'च्या परिघावरून आंत डोकावून पाहायचं ठरवलं !

त्या साठी अर्थातच, कुणा अधिकारी व्यक्तीचं दार ठोठावणं आलच.. मग हक्काचं माणूस कोण ? डोळ्यापुढं एकच नांव आलं.. म्हणजे तशी बरीचं नावं असतील पण मी आपलं विचारलं, आनंदला.. आनंद भाटे...गळयांत जन्मजात गंधर्वस्वर घेवून आलेला.. 'आनंद गंधर्व' (

याला आनंदगंधर्व म्हटल्या बरोब्बर, एका, निवासानं मुबैकर पण वृत्तीनं पुणेकर, प्रथितयश, पुरोगामीलक्षणधारीदेदीप्यमान साहित्यिकाच्या पोटांत काय दुखलं कुणास ठावे ? पुण्यातल्याच दुसऱ्या एका बालकलाकाराचं कौतुक करतांना त्यानं, 'पुण्यांत गल्लोगल्ली आतां गंधर्व दिसायला लागलेत..' अशी कुजकट, दुगाणी झाडल्यागत, टिप्पणी, दिल्लींतल्या एका भाषणांत.. हे ध्वनिमुद्रण मी स्वत: ऐकलय हं.. केली, आणि स्वत:ची 'गल्ली' संस्कृती चव्हाट्यावर मांडली... जे समोरून वार करू धजत नाहीत ते अशा दुगाण्या, मागच्या खुरांनी झाडतांत.. त्यांतून या गृहस्थांना अशा फुसकुल्या, नथींतले तीर वगैरे शस्त्रांचा उपयोग करून, हंशे 'वसूल' करायची खोड होतीच... असो !) हो ! त्यानं दिलेल्या माहितीप्रमाणे,हा कलिंगडा+बिभास असा मिश्र राग आहे. मनांत परत एक विचार आला. म्हटलं, बापरे दोनदोन 'राग' असूनसुद्धा, ज्याला जोहार घालायचा त्याचा, करभरणीच्या मोहोरा मोजायला विलंब लागल्यामुळं झालेला संताप, आलेला 'राग' सुद्धा शमवील अशा शब्दांबरोबरच (रचना-संत चोखामेळा) अशी ही सुरावट देणाऱ्या संगीतकारांचं (संगीत-मा.कृष्णराव, विनायकबुवा पटवर्धन) आणि त्या आर्जव भरल्या (भारल्या ?) गंधर्वकंठातून उमटलेल्या स्वरावलीचं सुद्धा कौतुक तुम्ही आम्ही बापडे काय करावं ?

गंमत म्हणजे संगणकीय महाजालावर..Internet.. या पदाच्या माहिती-आलेखामधे त्याची चाल 'लावणीची' असल्याचं म्हटलं आहे. असेल असेल. कारण, तुम्ही पठ्ठे बापुरावांची मुंबईची लावणी, मूळ चालींत ऐका.. मी म्हणतो ते तुम्हाला पटतं की नाही ते पाहा !

मी स्वत: बालगंधर्वांना पाहिलय.. मुंबईला राम मारुती रोडवरच्या मालती बिल्डिंग.. मुकुंदनिवास मधे मी राहात असतांना.. त्यांना खुर्चीवरून उचलून आणलवत.. खाकी अर्धी चड्डी आणि खादीचा बंडीवजा अंगरखा.. डोकीचा तुळतुळींत गोटा.. गोंडस, निरागस, निर्व्याज, गोल गोबरा चेहेरा... डी. एल्. वैद्य रोड वरच्या ब्राह्मणसहायक संघाच्या.. आतां जिथं

'धन्वंतरी रुग्णालय आहे तिथं.. त्या दिवशी रामभाऊंच्या पंडित राम मराठ्यांच्या मुलांच्या मुंजी होत्या बहुतेक.. त्या सोहळ्याला उपस्थित राहाण्यासाठी आलेवव्ते 'ते'..

नुसतं पाहिलंच नाही तर गाणंसुद्धा ऐकलं त्या दिवशी... त्या गलितगात्र अवस्थेंत कां होईना पण, कंठातला दैवदत्त, रियाजी स्वर थोडाच विरतो? कंप पावला असेल कदाचित पण कंपन संख्या? अं हं ती अबाधीतच राहिली होती !

तेंव्हा ते पद म्हटलं होतं त्यांनी, 'जोहार मायबाप जोहारं..'

तरी पण सुरुवातीलाचं, मायबाप वाचकांना जोहार घालतांना, या ओळी का दाटाव्यांतं माझ्या ओठांत ?

कदाचित, माझा स्नेही आनंद.. आनंद अभ्यंकर आणि अभिनयाच्या क्षितिजावरचा उगवता तारा अक्षय.. यांना नियतीनं अकाली हे शब्द म्हणायला लावले म्हणून ?

प्रत्येक खेपेस सुरुवातीला गुढ्या-तोरणंच उभारायला कशाला हवींत..

ज्यांनी आपल्याला अनंत सुखद क्षण बहाल करताकरता, मंचावरून Exit' घेतली..

त्यांच्या स्मृती अलवार जोजवत कां नाही करायची सुरुवात.. त्यांच्या आशीर्वादानं ?

*****

# कल्पद्रुम

तसा बाबूजींचा आणि माझा परिचय, अर्थांत श्रीधरमुळं. ७२ मधे दूरदर्शनच्या सुरुवातीच्या काळांत, युवदर्शनकरिता श्रीधरनं गाणी केली होती. त्या निमित्त घरी जाणं व्हायच आणि सुधीर फडके नामक विभूतीचं दर्शन घडायचं..

श्रीधर आणि त्याचा, उदय चित्रे नावाचा एक मित्र मिळून, दोघांनी, 'युवदर्शन'साठी, नवीन गाण्याचा एक कार्यक्रम केला होता. त्यांत, राणी वर्मा, खळेसरांची कन्यका, अशी तरुण मंडळी गायली होती. त्याच दरम्यान, सुधीर...मोघ्यांचा...'स्वतंत्रते भगवती' या शीर्षकाचा, स्वरचित कवितांचा कार्यक्रम, 'युवदर्शन'साठीच सादर केला होता. पण रोज नवनवीन संकल्पना, घाट, यांचा विचार करायलाच लागायचा. कारण, एखाद्या रासायनिक उद्योगामधे ज्या प्रमाणे एखादी प्रक्रिया सुरु केल्यावर तिच्यांत खंड पाडणं श्रेयस्कर नसतं, तसच दोन ऑक्टोबरला प्रक्षेपण सुरू झालं तेंव्हा पासूनच हे 'अहर्निशतेच' भान आम्हाला ठेवावच लागत होतं. 'त्याचसाठी' चालायचा हा 'अट्टाहास'...

असेच आम्ही गप्पा मारत बसलो असतांना...ती एक परंपरा होती, स्टूडिओच्या पायऱ्यांवर बसून गप्पा मारायची, ज्यांतून पुढे अनेक गाजलेल्या कार्यक्रमांच्या संकल्पनांचे धुमारे फुटले...ज्याला मराठीत, Brain-Storming म्हणतांत, आणि ज्यासाठी आजकाल, वाहिन्यांकडे किंवा निर्मिती संस्थांकडे Creative आणि Research Team या नावाचा, भरपूर कर्मचारी असलेला स्वतंत्र विभाग असतो....तर तसे ' कांही सापडते का ?' याचा विचार करतांना, सुधीरला कल्पना सुचली आणि संत ज्ञानेश्वरांच्या रचनांवर कार्यक्रम करायच ठरलं.

सुधीरनंच, 'आणिले टिपुनी अमृतकण', म्हणजे कांही रचना निवडल्या. मग त्यांना 'स्वरसुधे'त भिजवण्यासाठी स्वरपूजकाचा शोध सुरू झाला. तो पर्यंत बाबूजींच घर, 'आपलंच' झालं होतं. त्यामुळं अर्थातच, ती जबाबदारी श्रीधरकडे सोपविली गेली. आणि मग गायक? भरदार आवाजाचा उत्तम गायक, रवी साठे, घरचाच म्हणजे, FTII मधून पदविका संपादन करून, नुकताच दूरदर्शनमधे, ध्वनिमुद्रक म्हणून रुजू झालेला. सुरेश तेंव्हा, कोल्हापुरांतून मुंबईत येवून, गुरुवर्य जियालाल वसंत यांच्याकडे गायनाच शिक्षण घेताघेता, 'गीत संध्या' या युवदर्शनच्या कार्यक्रमांत आधीच सहभागी झाला होता, त्यानंही पटकन हो म्हटलं. नाही म्हणायचा प्रश्नच नव्हता कारण तो स्वत:च्या 'गायनकळे'ला येनकेन प्रकारे रसिक, संगीतकार, चित्रपट-निर्माते, ध्वनिफीत निर्मिती संस्था यांच्या समोर माडायला माध्यमं शोधतच होता. जान्हवी...जानू, पणशीकरांची...छान गायची...तिचा पण अंतर्भाव झाला कार्यक्रमांत. अजून आठवतय मला, वीर सावरकर मार्ग... कॅडेल् रोड.. वर सिद्धिविनायक पेट्रोल् पंपा समोर घर होत पणशीकरांचं. मी त्यांची परवानगी काढायला गेलो होतो, तेंव्हा प्रभाकरजींची भेट आणि ओळख झाली. तसं 'दूरदर्शन' हे माध्यम नवीन होतं आणि जरा चित्रपट माध्यमाच्या जवळच जाणार होतं, त्यामुळं, कार्यक्रमांत भाग घेणाऱ्या मुलींच्या घरी परवानगी घ्यायला आम्हाला जातीनं जायला लागायचं, पालकांकडून 'जोखून, पारखून' घेण्यासाठी. तर अशी गायकांची निश्चिती झाल्यावर मग...उरले ते... निरूपक? अर्थातच दस्तुरखुद्द, सुधीर मोघे. मोघ्यांनी ओव्यापण छान निवडल्या होत्या.

कार्यक्रमाच्या तालमी सुरू झाल्या आणि खूप मजा यायला लागला. सगळे तरुण, सळसळत्या उत्साहाचे ताजे आणि स्वरेल गायक, ज्ञानेश्वरांचे रसाळ, भक्तिरसान ओथंबलेले भावाकुल शब्द, आणि श्रीधरनं इतक्या सुंदर चाली केल्या होत्या आव्हान स्वीकारून की, 'क्या कहें' ? मुख्य म्हणजे, कुठल्याही स्वररचनेवर, एका, स्वत:चं युग निर्माण करणाऱ्या संगीतकार-गायकाचा मुलगा असूनही, त्यांच्या स्वरसंस्कारांची, आशीर्वादपर छाया वगळता, कुठलीही 'छाप' नव्हती. सुरेश, रवी, जान्हवी यांना त्यांची Solo गाणी शिकवतांना, श्रीधर स्वत:, इतका

उत्तम गाऊन दाखवायचा, की मी त्याला म्हटलं एकदिवस, 'अरे तू स्वत: का गात नाहीस एखादी रचना ?' आधीच अत्यंत संकोची, त्यांतून कधी कोणी.. का कुणास ठावूक, पण त्याला 'गाण्या'चा आग्रह केला नव्हता बहुतेक. त्यामुळे खूप आढेवेढे घेतल्या नंतर, मी त्याच्या खनपटीलाच बसलो तेंव्हा कुठे तो तयार झाला...आणि कार्यक्रमांत गायला...'त्रिभंगी देहूडा, ठाणं मांडूनीया राहे। कल्पद्रुमाखाली, वेणू वाजवीतो आहे ॥' आणि हा अभंग किती गाजला नंतर, हे मी तुम्हाला सांगायला हवं ? महाराष्ट्राला एक अत्यंत स्वरेल आणि आपली वेगळी शैली असलेला, स्वत: संगीतकार असलेला, स्वरेल गायकही मिळाला त्या दिवशी ! त्या कार्यक्रमांतलं प्रत्येक गाण गाजलंच आणि अजरामर झालं पण रवी-सुरेशची, 'निळीये रजनी वाहे, मोतीया सारणी ।' ही भैरवी तर आजही महाराष्ट्रातल्या रसिकांच्या ओठी आहे. शिवाय 'जाणीव नेणीव भगवंती नाही ' हे सुरेशनं, तर 'बरवा हो हरि बरवा हो ' हे रवीनं, आणि 'आपुला गुणग्राम सांडूनिया गेलिये ।' हे जान्हवीनं सादर केलेलं अशी आणखी तीन गीत होती या कार्यक्रमांत.

छान विठ्ठल मंदिराचं नेपथ्य उभ केलवत , 'कडू' आडनावाच्या आमच्या गोड नेपथ्यकारानं. समया, फुलांचे हार समोर पोथी, म्हणजे ज्ञानेश्वरी, अशा थाटांत मोघे बसले होते, निरूपणार्थ. साध्या, सोप्या सरळ भाषेंत, युवदर्शनच्या. अपेक्षित प्रेक्षकवर्गाला समजेल असे छान बोलले मोघे. त्यावेळी आम्हा कोणाकडेच Video Recorders वगैरे नव्हते, आंणि छायाचित्र, कार्यक्रम चालू असतांना काढायचं भान आंणि हौस दोनीही नव्हतं. कारंण कार्यक्रम निर्मितीचीच एवढी झिंग असायची सर्वांना की इतर सगळया गोष्टींचा विसर पडलेला असायचा. पण त्यावेळीही, सुधीरचे एक चाहाते असलेले, बाळासाहेब चाफेकर यांनी तो कार्यक्रम, एका ध्वनिफीत कॅसेट् वर मुद्रित करून ठेवला होता त्या मुळ तो आजही ध्वनिरूपांत उपलब्ध आहे....

***

## 'धाडसी पण आवश्यक..'

हिंदुस्थानावर, पूर्व-पश्चिम अशा दोनीही बाजूंनी कुरापती काढत, कायमचं दुखणं बनण्याचे पाकिस्तानचे मनसुबे, 'भले तरी देवू कांसेची लंगोटी । नाठाळाचे माथी हाणू कांठी ॥' या संतश्रेष्ठ सुकाराम महारांच्या ओवीप्रमाणे, प्रमाणाबाहेर चालविलेल्या पाकिस्तानच्या माकडचाळयांनी त्रस्त होवून तत्कालीन पूर्वपाकिस्तानमधल्या असंतोषाचा अत्यंत चतुरपणे फायदा उठवत, कै. इंदिराजींनी, अक्षरश: उभे चिरले. आंतरराष्टीय स्तरावर खळबळ माजविणारा हा धाडसी निर्णय, त्यांच्या इतक्या समर्थपणे कोणी अन्य नेत्याने...पोलादी पुरुष सरदार वल्लभभाई पटेलांशिवाय...घेतला असतां कां ? ह्या विषयी शंकाच वाटते.

९/११ ला अमेरिकेवरील दहशतवाद्यांनी केलेल्या हल्ल्यानंतर, आणि त्यानंतर अफगाणिस्थानवर अमेरिकेनं, अतिरेक्यांना त्यांच्या बिळांतून बाहेर काढण्यासाठी, त्यांच्या तळावर केलेल्या पूर्वदिशित ड्रोन क्षेपणास्त्र हल्यानंतर वैश्विक स्तरावर दहशतवादी आणि अतिरेकी यांची दहशत इतकी वाढली की शांतताप्रिय राष्ट्रांचे अध्यक्ष, पंतप्रधान एकत्रित आणि उघडपणे हे छळसत्र संपविण्यासाठी कटिबद्ध झाले.

त्यांतून एखादी महिला राष्ट्रप्रमुख असली तर ती जरा जास्तच आक्रमक असते (कारण मादीच फक्त आपल्या पिलांच्या संरक्षणाबाबत इतकी कठोर आणि क्रूर होवू शकते) की

काय अशी धरणा पक्की करीत, एक जहाल भाषण, एका, सलग दुसऱ्यांदा नवनिर्वाचित राष्ट्रप्रमुखानं केलं.

ओह ! क्या बात है ? तिनं हे पुन्हा एकदा सत्यांत उतरवून दाखवलं. ऑस्ट्रेलियानं नाही म्हटलंय. दुसऱ्यांदा.. हे तिनं खरं करून दाखवलंय ! स्वतःच्या कठोर वागणुकीच्या पवित्र्यांतून ती कदापीही मागं हटणार नाहीये ! आणि स्वदेशवासियांच्या हक्काबद्दलच्या तिच्या जागरूकतेला दाद द्यायलाच हवी आपण सर्वांनी ! एखादी स्वच्छ, थंडगार वाऱ्याची, वेलींवरच्या ताज्या फुलांचा सुगंध लेवून आलेली मंद झुळूक अंगावर सुखद शहारा आणत आणि मनाला आश्वासक सहारा देत प्रसन्न करीत अलवारपणे कळत नकळत, आसमंत व्यापावी तस कांहीसा निर्णय ऑस्ट्रेलियन प्रधानमंत्री महोदयांनी घेतलाय !

विश्वांतल्या यच्चयावत राष्ट्रांना सध्या अशा पुढाऱ्यांची नेत्यांची गरज आहे.

ऑस्ट्रेलियन प्रधानमंत्री ज्यूलिया गि्लार्ड्.

मुस्लिम शरियतप्रमाणे जगू-वागू पाहाणाऱ्या नागरिकांना देश सोडून जाण्यास सांगण्यात आलं आहे. कारण कुठल्याही धर्माच्या मूलतत्ववाद्यांच्या अतिरेकी, दहशतवादी कारवाया आणि लाड या पुढं ऑस्ट्रेलिया खपवून घेणार नाही

कांहीश्या संतापानंच ज्यूलिया जी, मुस्लिमांवर कडाडून गरजल्या, ’इथल्या स्थानिक ऑस्ट्रेलियन जनतेच्या ऐवजी: इथं नव्यानं स्थाईक होवू पाहाणाऱ्यांनी इथल्या सामाजिक सांस्कृतिक आर्थिक वातावरणाशी जुळवून घेतलं पाहिजे. हे पटत असेल तर गुण्यागोविंदानं राहा नाहीतर चालते व्हा, मुकाट्यानं.. कारण मला कुणा एका व्यक्तीच्या किंवा समूहाच्या सामाजिक, सांस्कृतिक धार्मिक भावना दुखावल्यातर जात नाहीत ना ? वगैरे बाबींची काळजी करायचा खरंच कंटाळा आला आहे. बालीमधे दहशतवाद्यांनी केलेल्या निर्घृण हत्याकांडानंतर, देशांत राष्ट्रीय भावनेची जणू कांही ’त्सुनामी’ आली आहे.. ,आणि सगळे देशवासीय त्यानं भारावले आणि वेड्यासारखं वागायला लागलेत आहेत.

स्वातंत्र्यप्राप्तीसाठी, झगडतांना इथल्या स्थानिक अबालवृद्ध युवक-युवतींनी जवळपास दोन शतक पिळवणूक, अत्याचार, दंडेली, स्वातंत्र्यसैनिकांवरचे न्यायासनासमोर उभे राहिलेले खटले आदि संकटांशी सामना करीत पारतंत्र्याच्या बेड्या तोडत महामुश्किलीनं मुक्ती मिळवली आहे आणि सांस्कृतिक जडण घडण जपली आहे. आमचा सर्व बोली-लेखी व्यवहार इंग्रजीत चालतो. स्पॅनिश्, लेबेनीज्, अरेबिक, चायनीज्, जपानी, रशियन्, किंवा इतर कोणत्याही भाषेंत नाही.

बहुतेक ऑस्ट्रेलियन नागरिक देवाच्या अस्तित्वाला मानतांत. ही कांही ख्रिश्चन धर्माची, किंवा राजकीय अथवा परंपरावादी ध्येयांनी प्रेरित चलवळ नाही तर हे एक सत्य आहे.

कारण धर्मानं ख्रिश्चनं असणाऱ्या अबालवृद्धांनी उभारलेली आणि ख्रिश्चन धर्माच्या तत्वाधारित अशी ही भूमी, हे राष्ट्र आहे, आणि हे संदर्भाधीन कागदपत्रांमध्ये अधोरेखित केलेलं आहे. आणि अर्थातच माझ्या या राष्ट्रातल्या प्रत्येक शैक्षणिक संस्थांच्या दर्शनी भागांवर त्याबाबतचा मजकूर असण हे अगदी स्वाभाविक आहे. कारण 'देव' हा आमच्या संस्कृतीचा अविभाज्य भाग आहे.

'देवा'च्या अस्तित्वावरच्या श्रद्धेबद्दल तुमच्या मनांत आकस असेल तर तुम्ही, ऑस्ट्रेलिया व्यतिरिक्त या विश्वांतला इतर कुठलाही भाग तुमच्या कायमस्वरूपी वास्तव्यासाठी निवडू शकता.

तुमच्या श्र्द्धा, श्रद्धास्थानं, धर्मगुरूंबद्दल आमचा काहीही आक्षेप नाही. तसाच तो तुम्हाला आमच्या श्रद्धांबद्दल नसावा आणि आमच्याबरोबर तुम्ही गुण्यागोविंदानं, शांततापूर्वक आपलं आयुष्य इथं व्यतीत करावं ही माफक अपेक्षा आहे.

ही आमची भूमी, आमचं राष्ट्रं आणि आमची जीवनशैली आहे, आणि आम्ही या सगळयाचा पुरेपूर उपभोग घेण्याच्या सर्व वाटा तुम्हाला खुल्या करून देवू.

पण तुम्ही जर तक्रार, कुरबूर, नापसंती, असंतोष या पोटी धुमसणाऱ्या क्रोधाच्या भरांत, आमचा राष्ट्रध्वज, आम्ही राष्ट्राच्या नावानं घेतलेली आण आणि आमच्या ख्रिश्चन श्रद्धा, श्रद्धेय यांचा अधिक्षेप करण्याचा यत्किंचितही प्रयत्न केलांत, तर तुम्हाला ऑस्ट्रेलियन पद्धतीच्या स्वातंत्र्याचा आहेर मिळेल... हा देश सोडून जाण्याचं स्वातंत्र्य !!

तुम्ही जर इथं सुखी नसाल तर कृपया चालते व्हा. कारण आम्ही तुम्हाला इथं येण्याचं आमंत्रण कधीच दिलं नव्हत. तुम्ही तुमच्या स्वत:च्या सुखाच्या शोधात इथं येण्याचं निश्चित करून आला आहांत हे कायम ध्यानांत ठेवा, तेंव्हा जे राष्ट्र तुम्ही पूर्ण विचारांती निवडलंय त्याचा स्वीकार करा.

धन्यवाद !

ऑस्ट्रेलियन प्रधानमंत्र्यांच्या या भाषणांतला सूर जरी कांही विशिष्ट दहशतवादी संघटनांविरोधांत असला तरी पिळवणूक आणि पारतंत्र्यातून सुटका करून घेण्यासाठीचा लढा, त्या भावनेंतून जन्मलेली अतिरेकी प्रवृत्ती आणि सत्तालोलूपता आणि जगावर राज्य करण्याच्या अहंकारी महत्वाकांक्षेपोटी अतिरेकी अत्याचार या मधे फरक करायलाच हवा.

आणि हकनाक दहशत माजविणे ही विशेषत: मानव 'जमाती'ची... मग ती कुठल्याही देश-प्रांत-जात-पंथ-धर्माची असो... प्रवृत्ती आहे.

महान तत्ववेत्ते, सर बर्ट्रांड् रसेल यांनी बघितलेलं वैश्विक प्रजासत्ताकाचं स्वप्न हे स्वप्नच जोपर्यंत राहील तो पर्यंत असे क्रोधोद्गारांचे उद्रेक होतच राहाणार...

*****

# जे जे जगी या जन्मते

जे जे जगी या जन्मते, उमलून फुलते, बहरते
कालापरत्वे शुष्क अन् निष्पर्ण होवुन संपते...
चुकले कुणां कां हे कधी, जरि होतसे परमावधी
वय जाय पुढती हर क्षणी, 'लय' साधतो बेसावधी,
म्हणुनी कुणी कां थांबती, शिर धरुनी हाती बैसती,
बेतून कार्य नि योजना, धरती असोशि नि, धावती
उलटली साठी तरिही अजुन यौवनांत मी...

अशी भूमिका ठेवून वागा, हा एक सल्ला..कदाचित अनाहूत असेल, पण सार्थ आहे.

हजारो वर्ष जगलेले वृक्ष या अवनीवर अजून आहेत, पण अवघी शंभरी गांठलेली कितीशी माणसं आहेत ?

लाखांत एखादांच वयाची शंभरी गाठतांना, ओलांडतांना आपल्याला दिसतो, कळतो किंवा फारच क्वचित, आपल्या परिचितांपैकी असतो.

तुम्ही नव्वद वर्ष जगलांत तर तुमच्या पदरी दहा वर्ष शिल्लक असतांत..आणि ऐंशी वर्ष जगलांत तर अर्थातच, आणखी वीस वर्ष वाट पाहायची असते.

जर ’जायच्या’ आधी तुम्हाला फक्त कांही वर्षांचच आयुष्य उपभोगायला मिळणारं असलं आणि ’जातांना’ तुम्ही इथून ’कांऽऽऽहीऽऽऽही’ घेवून ’जाऊ’ शकणार नाही आहांत याची खात्री... अं हं ! ते एक त्रिकालबाधित सत्य असल्यामुळे, तुम्ही कंजूषपणे वागून कांही साध्य होणार नसतं.म्हणून..

पैसे खर्च करा, मौजमजा पुरेपूर करून घ्या, घ्यायचे राहिलेले आनंद या उर्वरित उतारवयांत जमतील तसे, तेवढे उपभोगून घ्या, त्यांतून शिल्लक राहिलंच तर ’सत्पात्री’ दानं द्या, पण  आयुष्यभराची सग्गळी कमाई, पुत्र-पौत्रांच्यानांवे करू नका, जर त्यांना परावलंबी झालेलं तुम्हाला पाहायचं नसेल तर...

तुम्ही ’गेल्यावर’ काय होईल याची चिंता करीत बसूं नका. कारण त्यावेळी खालेल्या तुमच्या चिमुटभर राखेला, राग-लोभ, प्रशंसा-निर्भत्सना, स्तुती-नालस्ती यांची जाणीवच नसणाराय् मुळी !

मुलांच्या चिंतेचे, काळजीचे गुलाम होवू नका, कारण त्यांचं नशीब तुम्हीच काय कोणीच बदलू शकणार नाही. ते तर, जसे तुम्ही वाढलांत जगलांत तसेच त्यांच्या पद्धतीनं वाढणार, जगणार आहेत. तेंव्हा व्यर्थ, फुकाचं मानसिक ओझं कशाला ?

मुलाबाळांच संगोपन करतांना, त्यांच्या बालपणी त्यांना काय हवं नको ते बघतांना, कोडकौतुक करतांना, त्यांच्या बद्दल फार अपेक्षा बाळगायची अक्षम्य चूक कधीही करू नका मित्रांनो ! कारण येणाऱ्या ’उद्यां’ ते त्यांच्या आयुष्याशी झगडण्यांत, कर्तव्यांच पालन, उदरनिर्वाहासाठी अर्थार्जन करण्यांत, , कौटुंबिक जबाबदाऱ्या पार पाडण्यांत व्यग्र असणार आहेत. जेआपल्या अपत्यांबाबत हे करणारनाहीत त्यांची अपत्य त्यांच्या ’असले’पणींच ’वडिलोपार्जिता’वरून वादविवाद, वितंडादि आयुध एकमेकांवर उगारणार आहेत, आणि तुमच्या ’महानिर्वाणा’ची प्रतीक्षा करण्यांतच आपल्या आयुष्याची इतिकर्तव्यतां मानणार आहेत.

तुमच्या स्वकष्टार्जित मालमत्तेचे तेच फक्त वारस आहेत याबाबत तुमच्या मुलाबाळांना हक्काची नुसती हमींच नाही तर शतप्रतिशत निश्चितीच असते.

तुमच्यासारखा साठ्योत्तर 'वर्धिष्णु' स्वत:च्या 'आरोग्य-संपदा' या पैकी कशाचीही देवाणे-घेवाण करण्यापलीकडे पोहोचलेले असतांत. कारन आरोग्य हे कधीच पैशांनी विकत घेता येत नाही, हे तुम्हाला एव्हांना पटलेलं असतं. आतां पैसा.. मग तो किती मिळवायचा ? लाख ? दहा लाख ? कोटी ? दशकोटी, अब्ज ? हा ज्याचा त्याचा प्रश्न आहे. पण एक कायम ध्यानांत ठेवलं पाहिजे आपण सर्वांनी की एक हजार एकर उत्तम प्रतीच्या पिकाऊ जमिनीमधे घेतलेल्या भात पिकापैकी एकट्याला फक्त तीन भांड्यांचा शिजवलेला भात एका दिवसांला, आणि हजारो महालांची मालकी जरी तुमच्या गांठी असली तरी केवळ बहात्तर चौरस फूट जागा तुम्हाला रात्री झोपण्यासाठी लागते. आणि जोवर, तुम्हाला उदरनिर्वाहासाठी पुरेस अन्न मिळतय आणि तुम्ही जवळ पुरेसा पैसा बाळगून आहांत तर मग तुमचं उत्तम चाललं आहे असं म्हणायला हरकत नसावी, नाही कां? म्हणून आनंदी, प्रसन्न राहा.

अडचणी कुणाला आणि कुठल्या कुटुंबांत कुरबुरी नसतांत ? दुसऱ्यांच्या आमदनी, लौकीक, प्रसिद्धी, सामाजिक प्रतिष्ठा यांच्याशी स्वत:च्या तत्सम बाबींची तुलना करीत बसू नका. पुढची पिढी किती यशस्वी होते आहे, मुलाबाळांच्या प्रगतीचा आलेख उद्‌गामी आहे की नाही याकडे बारकाईने लक्षपूर्वक नजर ठेवा. आणि दुसऱ्यांच्या आनंद, प्रकृती आणि दीर्घायुष्याचं गमक साध्य करायचा प्रयत्न करा. जे बदल करणं तुमच्या आवाक्याबाहेरचं असेल त्यांच्या फंदात उगा पडू नका. तो वेळेचा अपव्यय तर ठरेलच आणि तुमच्या अनारोग्यालाही कदाचित कारणीभूत ठरेल.

तुम्हाला स्वत:लाच अखेर 'स्वांत:सुखाय' जगण्याचा आणि संतोष मिळवण्याचा प्रयास करावा लागेल. तुमच्या चित्तवृत्ती जोवर प्रसन्न आहेत, तोपर्यंत 'गोड गोष्टी', बकुळिच्या तळाशी मिळतांत तशा सुगंधित स्मृतींचीच कांस धरा. स्वत:ला 'छान' वाटेल अशा काहीतरी कृती, कर्तव्य, समाजकार्य रोज करायची सवय अंगवळणी पाडा. गंमत असते त्यांत आणि वेळही छान जातो हा एक 'बोनस्' फायदा..

एक दिवस 'आला तसा गेला' तर तुमच्या साठ्यांतला एक दिवस 'कमी' झाला, तोच दिवस तुम्ही 'आनंदमयी' केलांत तर तुम्हाला तो 'मिळाला' असं हे साधं गणित आहे ! 'प्रसन्नवदना'ला रोगराई सुद्धा वचकते, आणि लांब पळते, ' साजिरे' असाल तर व्याधी लवकर बऱ्या होतांत, आणि दोन्ही... म्हणजे आनंदी आणि खुशहाल असाल तर आजारपण येतच नाही. शिवाय उल्हसित चित्तवृत्तीनं, स्वच्छ सूर्यप्रकांशांतला व्यायाम, न्याहारींत आणि भोजनांत पुरेशी जीवनसत्व, क्षारं असलेले, विविध 'जायका'वाले पदार्थ यांचा समावेश केलांत तर, खात्री बाळगा की पुढची वीस-तीस वर्ष तुमच्या आरोग्याला कांऽऽहीऽऽही धोका नाही.

सगळयांत महत्वाचं म्हणजे स्वत:च्या आजूबाजूला बहुतेक वेळ 'आनंदविभोर' वातावरण राहील याची दक्षता घ्या. आणि मित्रमंडळ ? त्या शिवाय आयुष्य असूंच शकत नाही कोणाचं; खरं की नाही ? तो एक महत्वाचा ऊर्जास्रोत असतो रोजच्या जगण्यांतला. त्यांच्या आणि त्याच्या शिवाय अस्तित्व? उघड्याबोडक्या माळावरच्या एकाकी, शुष्क, निष्पर्ण वृक्षासारखं ! त्याला काय असणं म्हणायचं ? अहो म्हणून ठेवलं ना..कुणीतरी..

'निंदकाचे घर (सुद्धा चालेल एकवेळ, पण), असावे शेजारी'

तेंव्हा.. शुभेच्छा...

हो, आणि 'साठ्योत्तरी' साजऱ्या करणाऱ्या तुमच्या सुहृदांना ही 'विचार=आहेर' नक्की द्यायला विसरू नका !!

*****

# मर्कटांची पुच्छ

ही ना तक्रार अथवा वेदनांची यादी

भविष्यांतल्या बदलांची आहे,

नोंद घ्यावी अशी नांदी.

पण ढळू नका चळू नका, खुशीत राहा,  निःशंक निचिंत

आज तरी सुविधांची आपणा कुणाला नाही भांत

आला दिवस मजेंत जगा, बदल तर होतच राहाणार,

उत्क्रांतावस्थेंत, या पुढेही मर्कटांची पुच्छ गळूनच जाणार

या 'नवां'ची नवलाई बहुधा आतां नुरली नि सरली

'गर' सगळा संपून गेला आतां फक्त 'सालं' उरली

..तर..

या, तुमच्या-माझ्या हयांतींत, कुणाला त्याच्यात्याच्या दृष्टिकोनाप्रमाणे आवडो वा नावडो, पण कालानुपरत्वे लोप पावत जाणाऱ्या किंवा परिवर्तन पावत जाणाऱ्या नऊ बाबी

'सुख'सोयी, 'रोजमराकी जिंदगी' सुसह्य करणाऱ्या सुविधा, ...तुम्ही त्या बदलांसाठी तयार असा किंवा नसा... कुठल्या ?

टपाल-कार्यालयहीन संज्ञापनाला सामोरं जायला तयार राहा. कारण त्यांची अर्थव्यवस्था इतकी ढासळलेली आहे कीं त्यांतून बाहेर पडण आणि फार काळ कार्यप्रवण राहाणं त्यांना यापुढ अवघड आहे.

ई-मेल्, फेड् एक्स् आणि यूपीएस् हया इतकया कमी खर्चिक आणि वेगवान संज्ञापन सुविधांनी, कागदी पत्रांच, टपालानं येणा-जाणाऱ्या संदेश वहनाचं जग जणू संपुष्टांत आणलं आहे. कारण आज अनावश्यक माहितीपत्रकांचा 'कचरा' आणि कागदी बिलांची, धूळ खात पडणार अडगळ आणि रद्दी ह्या 'तापदायक', या सदरांत मोडल्या जातायुत !

धनादेश..

इंग्लंड्मधे, इसवीसन २०१८ च्या अखेरीपर्यंत, धनादेशाची बोळवण करण्याचे प्रयत्न सुरू झालेत या आधीच. कारण अक्षरश: कोट्यवधी डॉलर्स् केवळ धनादेश वटविण्याच्या प्रक्रियेवर खर्च होण्याचा भार देशाच्या अर्थव्यवस्थेवर दरवर्षी पडतो. क्रेडिट कार्डचा वापर आणि संगणकाद्वारे व्यवहार या दोन्हीही पर्यायामुळे हळूहळू धनादेशांचा वापर बंद होत चाललाच आहे. आणि पर्यायानं टपाल कार्यालय सुद्धा या मुळं 'कार्यरहित' होण्याचा संभव आहे. कारण तुम्ही तुमची देयक जर महाजालातर्फे मिळवत आणि भागवत असाल तर मग ती टपालाने देवाणघेवाण करण्याचा प्रयास वाचतो आणि पर्यायानं टपालकार्यालयांच बरचसं काम सुद्धा ठप्प होतं.

वृत्तपत्र, नियतकालिक म्हणजेच दैनिक, साप्ताहिकं किंवा मासिकं...

तुम्ही सांगा, तरुण पिढीच्या प्रतिनिधींपैकी कितीजण रोजचं वर्तमानपत्र किंवा एखाद नियतकालिक नियमितपणे वाचतांत ? हाताच्या बोटावर मोजण्याइतके सुद्धा नाही. कारण त्यांना सकाळी उठून घाईघाईनं सगळी आन्हिकं उरकून त्यांच्या 'दफ्तरी'' दाखल व्हायचं असतं. कुठून बिचाऱ्यांना वेळ मिळणार ? कित्येकजण तर मुद्रित माध्यमांशी फारकत घेतलेलेचं असतांत. भविष्यांत 'दूधवाला' आणि 'धोबी' यांचीही हीच दशा होणार बहुधा.. म्हणजे तेही 'येणं' हे लोक बंद करनार... म्हणजे दुधाच्या गोळया आणि 'क्रीज्लेस्' कापडाच्या ३/४ चड्या

आणि 'टी-शर्टस्‌चा वापर वाढवून.. अहो तुम्हाला चल्त्ध्वनिसंचावर महाजाल उपलब्ध झाल्यावर कोण घरी 'वर्तमानपत्रांच्या घड्या उघडत-घालत बसणार ? उगाच रद्दी.. झालं, ? म्हणजे रद्दीवाल्यांच्या पोटावरसुद्धा पाय.. उद्या प्रकाशक आणि विपनक ॲपल् सारख्या संस्थांबरोबर हातमिळवणीकरून 'मूल्याधिष्ठित'' मजकूर-सेवा देण्याची संकल्पना राबवतील.. अं हं त्यांना ती राबवावीच लागेल अन्यथा देशोधडीला लागतील बिच्चारे !

पुस्तकं

तुम्हाला वाटतय ना की तुम्ही तुमच्या हातांत पुस्तक घेवून त्याची पानं उलतत आरामांत वाचत पडून राहाल. मलाही, माझ्या आवडीच्या संगीता बद्दल तसंच वाटत होत. की माझ्याकडे ध्वनिचकती असेल आणि मी ती पाहिजे तेंव्हा वाजवून ऐकू शकेन. आणि तसं होतही होतं पण जोपरंत मला आय ट्यून्स्‌वर, जवळ जवळ निम्म्या किमतींत तीच गाणी.. अगदी अद्ययावत.. 'उतरवून घेणं शक्य झालं नव्हतं किंवा ते तंत्रज्ञान माहीत नव्हतं तोपर्यंत. आणि ते सुद्धा घराच्या बाहेर न पडता, विनासायास ! पुस्तकांच्या बाबतींतसुद्धा... माझ्याकडून लिहून घ्या की.. तुम्हाला तोच अनुभव येणार आहे नजिकच्या भविष्यांत. विनासायास, घरबसल्या, महाजालांतल्या पुस्तकांच्या दुकानांत जावून पुस्तकांचे अभिप्राय, परीक्षणांचा तौलनिक अभ्यास करून, तुम्ही पाहिजे ते पुस्तक, निम्म्याहून कमी किमतींत वाचू शकणार आहांत महाशय ! आहांत कुठं ? फरक एवढाचं की पानं बोटांनी 'उलटा'यच्या ऐवजी तुम्हाला ती 'क्लिक्' करायला लागणार आहेत. तुम्ही त्या मजकुरांतल्या आशयाच्या मध्यभागी विराजमान होत, आपण पुस्तक हातांत धरण्याऐवजी संगणक' नावाच्या एका सुविधे समोर बसलो आहोत याचं कालांतरानं विस्मरण होणार आहे तुम्हाला, आणि एक दिवस या सवयीचेही गुलाम होणार आहांत.

सर्वसामान्य दूरध्वनिसंच जोडणी:

जर तुमचं कुटुंब एकत्र कुटुंब पद्धतीचं नसेल आणि तुम्ही दिवसांत, दूरध्वनिसंचाचा स्थानिक संपर्कासाठी खूप उपयोग करीत नसाल तर अशा परिस्थितींत, तुम्ही

सर्वसामान्य दूरध्वनिसंच जोडणीऐवजी साहाजीकच, चलत्ध्वनिसंचालाच पसंती देणार ना ? कांही लोक केवळ 'सवयी'नं अशी जोडणी ठेवतांतही, पण त्यांच्या हे लक्षांत येत नाही की कांही अनावश्यक सेवांसाठी उगाचच त्यांना शुल्क भरावे लागतं. आणि बहुतेक सर्व चलत्ध्वनिजोडणीसंस्था तुम्हाला त्याच दरांत संपर्काची सुविधा देतांत.

संगीत:

नवनवीन संगीतकार गायक विविधप्रकारच्या सादरीकरणाचे अनेकविध आणि खरोखरंच अप्रतिम प्रयोग करून पाहाताहेत पण दुर्दैवाची गोष्ट अशी की, महाजालावरच्या उपलब्ध संगीताचं बेकायदेशीर 'अपहरण' आणि वापर यामुळं ही सगळी सर्जकता, प्रयास वाया जातांत की काय अशी भीती वाटण्याइतकी परिस्थिती गंभीर झाली आहे. सद्यस्थितींत संगीत-तबकड्या निर्मिती संस्थांनासुद्धा पूर्वीचा उत्साह राहिलेला नाही आणि आणि चित्रवाणीच्या 'आक्रमणा'मुळं 'ध्वनिप्रक्षेपणा'ला श्रोता नाही. हव्यास यशस्वितेचा आणि मत्सर यशस्वी झालेल्यांचा अशी दुधारी तलवार चालतेय ती मात्र सुरां'वर. शिवाय जुन्या जमान्यांतल्या गायक-गायिकांची गीतं अजून श्रोत्यांच्या मनांत रुंजी घालतायत हे आणखी एक कारण. संगीत मैफिलींची अवस्था याहून कांही वेगळी नाही.

या विधानांच्या पुष्ट्यार्थ, स्टीव्ह नॉपर्चं, स्वनाशाचा हव्यास.. "Appetite for Self-Destruction" हे पुस्तक वाचणं आणि "Before the Music  Dies."या शीर्षकाचा एक लघुपट तुम्ही बघण आवश्यक आहे असं मला वाटतं !

चित्रवाणी:

महाजालावर उपल्ब्ध असलेल्या कथापटांच्या प्रवाहा.. अं हं. धबधब्यामुळं लोकांचं त्यासाठी चित्रवाणीच्या छोट्या पडद्याला शरण जाणं, चित्रपटगृहांत तिकिटं काढून जाण्यापाठोपाठचं बंद झालय जवळ पास! शिवाय चित्रपटांव्यतिरिक्त, विविध मनोरंजक खेळ..आणि 'बरंच'कांही संगणकावर केवळ कांही 'क्लिक्स्'च्या अंतरावर हात जोडून उभं असतांना कोण फुकाचे कथापट पाहाणार ? prime time' असा आता मुळी राहिलाच नाहिये..

शिवाय चित्रवाणीच्या पदद्यावरचे तद्दन भिकार कथापट, दर चार मिनिटांनी चार मिनिटे पहाव्या लागणाऱ्या निरर्थक, निरुपयोगी जहिराती यांचा उबग आतां सर्वसामान्य जनतेला येवू घातलाय. आतां हळूहळू चित्रवाणी वाहिन्यांनी गाशा गुंडाळायला हवा कारण 'त्यांना' पाहिजे ते प्रेक्षकांनी बघण्यापेक्षा, प्रेक्षकांना त्यांच्या आवडीचं मनोरंजन निवडण्याचं स्वातंत्र्य संगणकीय महाजालाच्या क्षितिजावर तळपायला लागलंय !

'तुमच्या' मालकीच्या कांही गोष्टी:

तुमच्या खास खाजगी अशा कांही वस्तू, गोष्टी, बाबी ज्या आजही तुमच्या घरांत अस्तित्वांत आहेत, त्या कदाचित उद्या तिथं नसल्या तर चक्रावून जावू नका. तुमच्या संगणकाची Hard-drive, तुमच्या संगणक प्रनाली ज्याचांत आहेत आणि ज्या तुम्ही पाहिजे तेंव्हा संगणकाच्या Hard-driveमधे समाविष्ट करू शकता त्या तुमच्याकडच्या CD, DVD वर असतील ना ? पण आतां 'आपल्. मायक्रोसॉफ्ट्, गूगल् सारख्या संस्था यापुढ त्यांच्या सेवा बंद करतील आणि तुम्ही तुमचा संगणक सुरू केलांत की महाजालच एक सेवाप्रणाली म्हणून काम करायला लागेल आणि विंडोज्, गूगल्, मॅक्OS वगैरे सगळे महाजालाचे गुलाम होतील. तुम्ही एखाद्या चिन्हावर क्लिक् केलंत की महाजालाचं महाद्वार उघडेल आणि कांही 'वाचवायचं' असेल तरीही महाजाल त्याचं ग्रहण करून त्याला 'ग्रहण' लागणार नाही याची काळजी घेईल.

अर्थांत 'ते' या महाजालावरच्या अब्जावधीगोष्टींमध्ये हरवून जाईल कां ? 'आपल्या' असणाऱ्या बहुतेक गोष्टी कचऱ्यासमान होतील कां.. आणि छायाचित्रांचा तुम्ही जपलेला संग्रह, जपलेल्या पुस्तकांतलं मोराचं पीस किंवा जाळीदार पिंपळ पान, एखादी महत्वाची CD ? या अमूल्य गोष्टी, ज्यांच्याशी तुमच्या अलवार भावना निगडींत आहेत त्यांचं काय होईल ? माहीत नाही...

आणि शेवटी.. अर्थातचं

'स्वत्व' 'सत्व' आणि 'संपृक्तता'

गतस्मृतींत रमण्याचा आनंददायी अनुभव, स्वत:शी जपलेले अनमोल क्षण, त्यांचा पुन:प्रत्यय नाही तरी आठवणी, हे आपलं नेहमीचाच एक स्वप्न, असोशी असते. ते 'खाजगी' पण आतां संपलंच आहे. कारण बारा महिने चोवीस काळ तुमच्या अवतीभवती, रस्त्यावर, घरांत तुमच्या संगणकावर, चलत्ध्वनिसंचाचर छायक तुमच्यावर पहारा देताहेत. तुम्ही कुठे आहांत, काय करतां आहांत, अगदी अक्षांश-रेखांशासह ठिकाणाच्या अचूक माहितीसह तुमचं 'स्वत:'शी असणं, तुमचं स्वत:चं अवकाश ओरबाडताहेत. तुमची खरेदी, तुमच्या सवयी लकबी, या सगळयावर 'त्यां'चं नियंत्रण असणार आहे. तुमची खरेदी. पसंती 'ते' बदलतील किंवा अगदी रद्द सुद्धा करतील उद्या...! आहांत कुठं ?

फक्त एकच गोष्टं आपल्या ताब्यांत राहाणार..अगदी खात्रीपूर्वक...म्हणजे आपल्या 'सुवर्णमूल्य स्मृती.

असो.. हे ही नसे थोडके..

पण सावध..

उद्या 'अल्झाय्मर्स्'.. किंवा 'स्मृतिभ्रंश' त्यां पासूनही तुम्हाला वंचित करू शकेल

'स्मृतिभंशात् बुद्धिनाशो

बुद्धिनाशात् प्रणश्यती

*****

***

## 'चार गोष्टी..न परतणाऱ्या'

एक सधन स्त्री, एका विमानतळावरच्या प्रतीक्षालयांत, आपल्याला घेवून जाणाऱ्या विमानाची वाट पाहात होती. कदाचित बराच वेळ प्रतीक्षा करावी लागेल या विचारानं तिनं, दरम्यानच्या मनोरंजनासाठी, वृत्तपत्र-विक्रेत्याकडून कांही नियतकालिकांची खरेदी केली, आणि संभाव्य 'क्षुधाशमनार्थ' कांही खाद्यपदार्थांचीही बेगमी केली.

बाईसाहेब, खरिदलेल्या वस्तूंसह, परत प्रतीक्षागृहांत  दाखल झाल्या आणि आपल्या आरामदायी आसनाचं अधिग्रहणकर्त्या झाल्या. कांही कालावधीनंतर, त्यांच्या शेजारच्या आसनावर एक गृहस्थ येवून बसला आणि हातांतलं नियतकालिक चाळू लागला.

बाईसाहेबांनी, नियतकालिकांतला एक लेख वाचायला सुरुवात केली आणि बरोबरच्या खाद्यपदार्थातलां एक तोंडात टाकला. गृहस्थानंसुद्धा बाईसाहेबांच्या कृतीची अगदी नकळत पुनरावृत्ती केली आणि खाद्यपदार्थातला एक घेवून तो चघळू लगला.

बाईसाहेबांच्या हे लक्षांत आल्यावर त्यांच्या कपाळाला एक आठी पडली...पण, 'जाऊ दे ! अनवधानानं झालं असेल कदाचित..' या विचारानं त्यांनी दुर्लक्ष केलं, आणि आणखी एक 'घास' उचलला आणि ग्रहण केला. थोड्या वेळानं, गृहस्थानं, एखादी प्रतिक्षिप्त क्रिया घडावी तसं, खाद्यक्रिया सुरू ठेवली आणखी एक घास उचलून, खायला सुरुवात केली.

गृहस्थाच्या प्रत्येक कृतीबरोबर, बाईसाहेबांचा पारा चढतच होता, पण मन धास्तावलं होतं, 'उगाच वादावादी वाढेल' म्हणून त्या जरी, मूग गिळून गप्प होत्या, तरी

संतापापोटी उद्भवलेल्या बेचैनीमुळं, मनोमनी गृहस्थाला शिव्याशापांची लखोली वाहतच होत्या, आयत्या बि्ळावर नागोबा, मेला !' वगैरे, वगैरे..

करतां करतां, वाचनांत मग्न दोन्हीही सहप्रवाशांपैकी गृहस्थाच्या लक्षांत आलं की खाद्यपदार्थाचा एकच तुकडा उरला आहे आंता. त्यानं त्याचे दोन समान भाग केले आणि त्यापैकी एक शिल्लक ठेवून दुसरा खाऊन टाकला. 'आता मात्र हद्द झाली याच्या निर्लज्जपणाची' असं म्हणत बाईसाहेब तिरिमिरीनं उठल्या. आपलं सामान बरोबर घेवून संतापदग्धावस्थेंत त्यांनी आपल्या नियोजित ठिकाणी ताडताड निर्गमन करत्या झाल्या.

इच्छित स्थळी पोहोयच्या आधी, प्रसाधनगृहांत जाऊन त्यांनी, झाल्या प्रसंगातल्या, त्या गृहस्थाच्या गर्हणीय वागणुकीच्या क्रोधानं, कपाळावर, कानशीलावर, नाकाच्या टोकावर, जमलेले घर्मबिंदू टिपण्यासाठी, 'पर्स्' उघडली आणि...

बाईसाहेबांचा चेहेरा त्यांनाच समोरच्या आरशांत बघवेना.. इतका उतरला होता.. क्रोधाचे, नाराजीचे, कांहीही न करता आल्याच्या घुसमटीचे सगळे रंग उतरले होते एका क्षणांत... कारण त्यांनी खरीदलेले खाद्यपदार्थ त्यांच्याच पर्स्मधे नीट अवगुठितावस्थेंत, सुखरूप होते. त्यांनी वाचनादरम्यानं उपभोग घेतला होता तो त्या गृहस्थानं खरेदी केलेल्या पदार्थांचा... ज्याच्यावरच्या रागानं, गेला जवळजवळ तासभर त्या धुमसत होत्या.. बाईसाहेबांनी खजिल मनानं, त्या गृहस्थांना, त्याच जागी शोधण्याचा प्रयत्न केला... पण तो गृहस्थ पण मार्गस्थ झाला होता तोपर्यंत... एका वेगळया समाधानानं. जवळच्या वस्तूला भागीदार मिळाल्याच्या समाधानानं...

पण आता कांहीही होवू शकत नव्हतं...दोघांचे मार्ग भिन्न झाले होते. परत कधी भेट होईल याची श्यक्यता पुसटशीही नव्हती.. हातांत होता फक्त पश्चात्ताप...आणि मनांत आयुष्यभर कुरतडून खाणारी खंत...

'अशी पांखरे येती,

आणिक स्मृती ठेवुनी जाती..

दोन दिसांची (दोन घडीची..म्हणूया हवंतर..या गोष्टीच्या संदर्भांत ) रंगत संगत,

दोन क्षणांची नाती !!’

या गीता प्रमाणे किंवा

’माडगुळकरांच्याच गीत रामायणांतल्या, ’पराधीन आहे जगती पुत्र मानवाचा’ या, भरत भेटीच्यावेळी, ’परत चला दादा, परत सिव्हासनाचं अधिग्रहण करून राज्यशकटाचं नियंत्रण हाती घ्या..’ अशी कळकळीची विनंती करणाऱ्या परमप्रिय बंधूच आणि आयोध्येच्या जनतेचं सांत्वन करीत समजूत घालणाऱ्या श्रीरामाच्या तोंडी, आयुष्याचं क्षणभंगूरत्व, हृद्य शब्दांत मांडून अजरामर केलेल्या गीतांतील ओळीप्रमाणे..

’दोन ओंडक्यांची होते सागरांत भेट

एक लाट तोडी दोघा पुन्हा नाहि गांठ’

तर कथेचं तात्पर्य:

चार गोष्टी या जगांत अशा आहेत की त्या निसटल्या की परत ’हांसिल’ नाही होवू शकत..

एक : फेकलेला दगड

दोन: उच्चारलेला शब्द

तीन: नुकसानीला कारणीभूत झालेला, घडलेला प्रसंग आणि,

चार: सरलेली वेळ !!

*****

# जगण्याचा '३१ मार्च'

परवा, माझा शाळेंतला वर्गमित्र भेटला. शाळेंत असतांना खूपच हुशार होता तो. इतका की त्याला एखाद्या विषयांत मिळालेल्या गुणांपेक्षा मला सर्व विषयांत मिळालेल्या गुणांची बेरीज सुद्धा कमी असायची. अर्थातचं तो वार्षिक परीक्षेंत पहिला तर आम्ही कांही दयार्द्रहृदयी गुरुजनांच्या कृपेने, वरच्या वर्गांत ढकलले गेलेले... असो..

तर त्याला म्हटलं 'बऱ्याच दिवसांनी भेटतोय् आपण.. आज संध्याकाळी ये ना घरी ! जरा बसू...गप्पा मारत..' (आजकाल हे स्पष्ट करायला लागतं, नाही तर लोक कांहीबाही अर्थ काढीत बसतांत उगा !) तर म्हणला, 'नको बाबा मार्च अखेर आहे. सगळे हिशेब चुकते करून ताळेबंद करायचाय्. एका पैशाची तफावत झाली तर सरकारी हिशेब तपासनीस जीव खातात..'

'ठीकै बाबा.' म्हणून निरोप घेतला आणि बोरकर..'बाकीबाबां'च्या दोन कविता आठवल्या,पहिली

विझवून दीप सारे, मी चाललो निजाया

आतां अशाश्वताची उरली मुळी न माया

आणि दुसरी

आतां माझ्या व्यथाकथा कुणा न येती सांगता

वृथा त्यांना कां दूषण, ना ये मलाच सांगता

मनांत आलं ! जगण्याच्या अखेरच्या दिवशी, सगळयांनाचं ताळेबंद द्यायचा असतो आपापल्या कर्मांचा, पाप-पुण्याचा...

नाहीतरी, कविवर्य रॉय किणीकरांनी त्यांच्या रुबायांमधे म्हटल्या प्रमाणे

इतिहास घडविला त्यांची झाली कीर्ती

इतिहास तुडविला त्यांची देखिल कीर्ती

तेंव्हा, आपण इतिहास घडविला की तुडविला ? त्याची नोंद झाली किंवा नाही ? सऽऽगळे जमा-खर्च स्मरून..

सगळे हिशेब द्यावे लागतांत बंद करून खाती,

टांक मोडून जावं लागतं, सोडून नातीगोती

मोह, माया, द्वेष, मत्सर, ममता, प्रेम, लळा,

नावं वेगळीवेगळी तरी खेळ खोटा सगळा

भाता वर-खाली तोवर 'तेवर' उधळायचे

धकधक थांबली की मग फक्त 'लाकूडं' उचलायचे

पण या हिशेबांत राहून जातो मरण्याला आलेला खर्च

म्हणतील, 'कसं फेडायचं हे ? थोडं कां झालय् घरचं ?'

कारण अहो.महागाईच्या तापल्या तव्यावरचं..

महागलय् मरण सुद्धा, दमड्या लागत्यांत लई

पड झड, रोग राई, हजार तोंडांची खाई

तपासणी अन् औशीधपाणी, देतय कोण फुकाट ?

कद्रावलेले आप्त, पाहून मरणारा जातो मुकाट

लहानग्यांन्ला वाढवायचं की म्हाताऱ्यांना जगवाय्चं ?

उलटुन पडतोय घास, पाणी तरी बळं भरवायचं..

उर्ध्व लागला तरी लावत्यांत नाकाड्यावर नळी

इस्पितळाची भर करायला उभी दागदरांची फळी

'मुलग्याला यायला येळ लागल ? ठेवा शीतगृहांत'

माती झाली तरी सैल सोडावा लागतुया हात

तिरडीचे बांबू नि निखाऱ्याला कोळसा,

नाई सस्त सुतळ बी आवळायला 'वासा'

आता नाही येणे जाणे, गात वरात निघते,

भजनी नी टाळकरी का भौ फुकटांत येते ?

चिरीमिरी द्यावी लागते, भेटायला 'पास्'

जगन्याला तर हायेच, पर मरनाला बी त्रास ?

तूप साजुक किरवंत मागतोय् 'धाडतो' म्हनतोय् 'स्वर्गांत'

डोरल्यांतल्या वाट्या बी हळूच घालतांत खिशांत

सरणावर लाकुडफाटा अखेर लागतोचं जाळाया

कवटी फुटेस्तोवर कोण असतो आंसवं ढाळाया ?

द्या फेकून रानांत, विसरून सुरकुतलेले हात

आजचं जिणं जगून घ्या, कशाला उद्याची बात ?

कोल्ही कुत्री 'मातीमोल' खाउन, देतिल तरी दुवा

उरल्यासुरल्या तुकड्यांच मुंग्या करतिल रवा

आत्मा म्हनं जातो वर आभाळांत वस्तीला

तितं कुठं जागा हाई ? गर्दी आलिया भरतीला !

एखादी सकाळ उजाडते मळभ घेवुन मनांत

प्रश्न उठवतो काहूर, घुमतो स्वत:च्याच कानांत

आयुष्य अंगावर येतय् मित्रा ! संपायचं कधी रे सगळं ?

आंतल्या आंत कोंडतोय जीव ,चावी गहाळ, बाहेर नुसतच टाळं

जगणं बरोबर घेऊन आलंय, मरणाचा वसा ,

म्हणून भोगला हरेक क्षण, भरून घेतला पसा

खोटं खोटं जगायला खरीखरी हवा नि श्वास

नवी वस्त्रं ? नको.. आतां 'कोऱ्या'चाच ध्यास

तिकाटण्यावर नको मडकं.. नको कर्मकांडं

आलं तसच जाऊद्या गळकं फुटकं भांडं

तुझी मदत काय मित्रा, या 'कार्यांत' होणार

आसवं गाळणारे सगळे माघारी घालवणार ?

आपल्या माघारी उरलेल्यांना, आपलं मरण हा 'आंत बट्ट्याचा' व्यवहार वाटू नये म्हणून मग म्हणायचं..

( ही भावना, मी माझ्या 'नक्षत्रांचे दिवस' या नव्या पुस्तकाच्या मलपृष्ठावर मांडली... की सांडली म्हणू ? पण आहे ! )

मी गेल्यावर, नको पिंड वा, नको तेरवा, नको दिवा,

दान करुनी पार्थीव-नेत्र,  द्या, मज मरणा, आयाम नवा

श्वास जोवरी नियमित चाले, हाव गाठते परिसीमा

निर्जीव माती उरे शेवटी, मुंग्या करती रवा रवा

आठवणींचे नाते असते अधिक करोनी अश्रूंशी,

विरहाला विसरुनी तुम्ही घ्या, मुक्त, मोकळी स्वच्छ हवा

येइल जेंव्हा आठव तेंव्हा गीत छानसे ऐका एक,

स्वरांस जडले आर्त खरे, अन् स्वर म्हणजेच खरा धावा

मजपाठी पापांचे पाढे जनहो वाचा नेमाने

नका चढवु शब्दांची बेगडि तद्दन खोटी आभुषणे

माणुस म्हणुनी जगलो साऱ्या विकार, व्यसनांबरोबरी

कोण हरीच्या लाले ठेविलि तीर्थाची मागे झारी ?

मनात शिरता आले तर सगळे दिसतिल बरबटलेले

'गरळ ओकले नाहि' म्हणा, स्मरुनी सगळे गोरे-काळे !

संधि मिळेतो साधू असती सज्जन, संत नि संन्यासी

म्हणविती जरि नि:संग  तरी 'मायेची' कैसी 'पैदासी'

शिव्या-शाप कोणा कधि चुकले, देण्याला वा घेण्याला

सुसाट सुटती 'ताप'स सगळे बोला भिडवित बोलाला

क्वचितच ज्ञानोब्बा अवतरतो ज्ञानी, योगी अवनिवरी

विरळा असंभवासम वसतो युगंधराच्या हृदयांतरी

*****

परत रॉय किणीकर..

हा दोन घडीचा तंबूतिल रे खेळ,

या विदूषकाला नाहि रडाया वेळं

लावून मुखवटे नवा खेळ चल लावू

सोडून सावल्या पडद्यामागे जावू

पडद्यामागे जावू

*****

# चक्षुर्वैसत्यम्

आजकाल सजग वृत्तवाहिन्यांमुळे सगळं जग, हीना-दीनांच, एकसमयावच्छेदेकरून, आपल्या दिवाणखान्यांत क्षणोक्षणी दाखल होते असतं. अगदी 'चक्षुर्वैसत्यम्' स्वरूपांत. फक्त इथं चक्षू असतो छायकाचा, कधी उघड तर कधी 'तहलका' पद्धतीचा.. 'छुपा' यांतलं दीनांच्या जग बहुतेक प्रेक्षकांना माहीत असतं कारण ते, म्हणजे जनसंख्येनं जवळपास ७५ ते ८० प्रतिशत, सर्वसामान्यांचं जिणं जगत असतांना त्या जगाचांच एक घटक असतांत. त्यामुळं त्यांना त्याचं अप्रूप नसत. फक्त ती समवेदना, समदु:खी बघून स्वत:च दु:ख हलकं करण्याची एक सुविधा म्हणून सुस्कारे सोडीत, चुक्चुक् करीत, असले कार्यक्रम किंवा वृत्तांकनं बघितली जातांत.

पण हीनांचं, म्हनजे हीन प्रवृत्तींचं दर्शन अशा वृत्तांकनांतून घडतांना, या हीन प्रवृत्तींच्या सीमा जेंव्हा थोरामोठ्यांपर्यंत विस्तारलेल्या समोर येतांत, तेंव्हा मात्र हे 'दीन' थक्क होतांत' ज्यांच्याबद्दल आदरयुक्त भीती, प्रीती, नाती बाळगलेली असतांत ते, 'अशा' प्रकरणांत गुंतलेले पाहाणं खूप कठीण होतं सर्वसामान्य जनांना !

कांही उदाहरणं...

आनंदांत कसे जगावे किंवा जीवनांत कसे यशश्वी व्हावे वगैरे, जनसामान्यांच्या 'स्वप्नां'ना पंख देण्यासाठी , सुरुवातीस छोट्या समूहांसमोर, शब्दसांभार उधळून, जखमेवर फुंकर मारल्यासारखे करणारे एक बाबा, पुढेपुढे, जरा नांव कमवायला लागल्यावर, मोठमोठ्या सभागृहांमधे देशांत प्रमुख शहरांमधे, किंवा परदेशांत, मसीहा असल्यासारखे हिंडायला

लागलेले पाहिले आणि माझ्या मनांत एक विचारांचं वादळ उठलं. हे  'बाबा' शहरांत किंवा परदेशी जिथं, धनिकांची वस्ती जास्त आहे अशीचं ठिकाणं कां बरं निवडत असावेत ? कारण, 'जिथं संपत्तीचा पूर आणि अति श्रीमंती, तिथ कायमच हुरहूर आणि भीती' हे सर्वमान्य वैश्विक विधान ठरावं इतकं सत्य आहे ! रोजी-रोटी कमावण्यासाठी कांहीच कष्ट करावे लागत नाहीत, मग करायचं काय ? मग सगळी 'करमणूक' क्षेत्र धुंदाळून झाल्यावर ही धनिक मंडळी कधीकधी वेळ घालविण्यासाठी असल्या बाबाफिबाच्या मागं लागतांत. पुढेपुढे अशा बाबांच्या प्रवचनांना उपस्थिती, ही एक प्रतिष्ठेची बाब होवून बसते आणि मग हे (संधि)साधू आपले 'रंग' दाखवायला सुरुवात करतांत, आश्रम काढतांत, अध्यात्मिक दौरे आयोजित करतांत, वनौषधींच्या नांवाखाली अनेक घातक गोष्टींचा चक्क 'व्यापार सुरू करतांत. हे आपण सगळं जवळपास रोज ऐकत बघत वाचत असतो.

जनावरांच्या गुरकावण्यापेक्षा जशी हाकाऱ्यांचीच आरडाओरड जास्त असते तसंच काहींसं खऱ्या विभूती आणि शिष्य़गणं(ग) यांचं असतं. ते बिचारे अशा, त्यांच्यातल्या कांही अनिष्ट प्रवृत्तीच्या 'भोंदूंमुळे नाहक बदनाम होतांत

प्राचार्य कै. राम शेवाळकर हे माझे ज्येष्ठ मित्र, समुपदेशक, विद्वान सल्लागार वगैरे.. त्यांचं एक वाक्य माझ्या कायम स्मरणांत आहे. ते म्हणायचे, 'लोकं आपल्याबद्दल बरं वाईट बोलतांत ना ? बोलू द्यावं त्यांना.. आपलं काम आपल्याबद्दल खरंखरं काय ते बोलतं.. बोलतं त्यापेक्षा दिसतं !' अशा वक्ता दशसहस्रेषु व्युत्पन्नाच्या काळांत त्यांचा सहवास लाभावा, ओघवतं ओजस्वी अस्खलित वक्तृत्व कानावर पडाव आणि आज ते गेल्यावर कांही वर्षांतच 'वक्तादशसहस्रधारे शू' अशा नेत्यांचे जनसामान्यांना बोल लावणारे बोल कानी पडावे ? हाय रे दुर्दैवा !!

थोरांचे का हो 'असे' अखेरिस होते ?

थेरांचे त्यांच्या अवडंबर माजते

कुणि सनई त्यजुनी सुंद्री फुंकित बसतो

अन् मृदंग सारुन टिमकी बडवित गातो

सूऱ्यास दावुनी ’पाठ’ उजळु जग पाही

जलधीची सोडुन साथ. ओंजळित राही

कपिलेस जखडुनी कुणी वराहा पुजितो

रुप्प्याचे ढकलुनि पात्र करटि चाटितो

कुणि अभिनय करतां खराच ठोसा देई

किंवा कोणाला कवळुन  ’बोसा’ घेई

विस्मरुनि वास्तवा तसाच वाह्वत जाई

कां भुरळ घालते ’अतिरेका’ची घाई ?

मग अश्रू ढाळित भीक दयेची मागे

आढ्यता प्रतिष्ठा तोडुन सगळे धागे

कुणि संस्कारी, कुणि साक्षात्कारी विभुती

फासते अंगभर कुणी राख अन् माती

वर जाता माया, मोह खेचती खाली

बदलते क्षणांतच देहाची अन् बोली

भक्तांच्या भावा, ’जोगी’ दाखवि धुनी

मग चिलीम फुंकित हसतो सगळे लुटुनी

वरकरणी निगर्वी, शांत नि भोळा, साधा,

जरि हात जोडि.. तो असतो भाई, दादा

उच्चपदस्थ कांही कमरेखाली ढिले

वलयाला त्यांच्या असती जन भुललेले

स्वग्रामी जाता, कुणी वीर वा नेता

कांपतांत नवत्या पोरी न्हात्या-धुत्या

कुणि नशा नसेंतच टोचुन घेई ’हस्ती’

कुणि मारझोड करि ’टाकुन’ बरीच ’जास्ती’

हे कतघ्न ढकलिति शिडीस अगदी सहज,

कां चढतो यांना यशश्वितेचा माज ?

कुणि वनांत जाउन उगा मारे चिंकारा

’कायदा ? काय ? कोठला ?’ लाज ना जरा..

कुणि ’धुंद’ होतं वेगाने हाके वाहन

पदपथावरिल ’गरीबां’ला देई मरण

मग उजेडांत हा येता प्रकार सगळा,

तर्जनी घालतो मुखांत ’साधा भोळा’

’जनहितार्थ अर्जी ’ होते दाखल कोठे

’तो’ देई वकील लढण्या मोठेमोठे

न्यायमंच बसतो, शोधित साक्षि पुरावे,

’तो’ निवांत हसतो ’बॉलीवुड’च्या गांवे

कुणि करूं पाहातो दुष्कालावर ’विधी’
अन् अनुदानाचा सहजच निगळे निधी
की खुर्ची यांच्या जिभेस देई वेगा ?
अन् निलाजरे जन कां हो हसती ? सांगा !
कारणे सांगती जनवृद्धीची ’भारी’
ही वांती झाली इंदापुरिच्या द्वारी
कुणि नेता कांही बाहीं सभेत बोले’
थोबाड विचकुनी ’चमचा-समूह’ डोले
कुणि ’गुर्जी’ ओढी शिष्या शेजेवरती
दावया धाक कुणि आहे अवतीभवती ?
किंकाळि वेदना घुमते हवेंत, विरते..
दाबाया ’प्रकरण’ सज्ज यंत्रणा येथे
तोफां-रणगाडे ’खोक्यातुन’ कुणि मागे
कुणि निलाजरा अध्यक्ष ’लक्ष्य’ अन् भोगे
चाटण्या लोणि ना हुतात्म्यांस सोडिति ?
पिंडांचे गोळे आधाशि हे, ओरपती !
गल्ली ते दिल्ली असेचं चालायाचे ?
गर्तेच्या खाइत स्वत:स गाडायाचे ?
*****

# नोंदवही

या लेखांतला मजकूर, पचनी पाडायला जरा जडच जाणार आहे वाचकांना. पण वस्तुस्थिती, एका परदेशी पर्यटकाला...इतिहासांत नाही तर अगदी दोन-तीन वर्षांपूर्वी... दिसलेली, त्यानं अनुभवलेली आहे ही ! आणि वाचल्यावर तुम्ही कदाचित सहमतही व्हाल लेखांतल्या प्रत्येक विधानाशी. कारण सगळंच वर्णन, त्या अवस्थेमागची कारणं, लाजिरवाणी आहेत, आपल्यासारख्या 'भारतीय' म्हणवणाऱ्या प्रत्येक व्यक्तीसाठी ! "सीन केली" हे त्या पर्यटकाचं नाव आणि त्यानं नोंदविलेल्या अनुभवांची सूची, कोणताही पूर्वग्रह न बाळगता नजरेखालून नुसता न घालता, त्यावर, तुम्ही आम्ही, आपण सर्व 'भारतीयां'नी अंतर्मुख होवून विचार करेणं गरजेचं आहे, असं मला वाटतं. त्यानं नोंदविलेलं सगळंच 'घृणास्पद', 'किळसवाणं', 'निंदनीय' निर्विवादपणे आपल्याला ठाईठाई पाहायला मिळतंय आणि आपण सगळे राजकारण्यांनी दिलेले 'अति लोकशाही'चे नशीले मूग गिळून 'गप्प' बसलो आहोंत. पण या कडवट सत्याला आपण 'डोळे उघडून' सामोर जायलाचं हवं.. आणि परिवर्तनासाठी वचनबद्ध, कटिबद्ध व्हायलाचं हवं !

सीन् केली आपल्या 'नोंदवहीं'त लिहितो..

*तुम्ही जर भारतीय किंवा भारतीय वंशाचे असाल तर, मी आधीच तुम्हला सावध करतो, आणि मला जाणीव.. नाही खात्री आहे की मी जे लिहीत आहे ते तुम्हाला मुळीच रुचणार नाही. पण या लिखाणांतल्या कठोर शब्दांपेक्षा त्यामागच्या मित्रत्वाच्या नात्यानं दिलेल्या सल्ल्याची दखल तुम्ही घेणं आवश्यक आहे असं मला वाटतं. तुमचा असा एक मित्र की जो अतिशय प्रामाणिकपणं आणि कळकळीनं कांही विदारक सत्य तुमच्यापुढं ठेवतो आहे. आणि अखेरीस पाश्चात्य संस्कृतीच्या दुराभिमानानं, आंधळेपणानं, मी हे सर्व नोंदवत आहे असा गैरसमज कृपया करून घेवू नका. कारण तुम्हा भारतीयांना सद्यपरिस्थितीचं भान असूनसुद्धा तसंच राहायची आणि गर्तेप्रत जायची इच्छा असली तर मी कोण बापडा, वेगळं कांही सांगू इच्छिणारा ? तेंव्हा तुम्हाला जे रुचेल पचेल ते ध्यानांत घ्या आणि बाकीचं सोडून द्या. त्यामुळं काहीही बिघडणार नाही, याहून जास्त. कारण माझ्या असं लक्षांत आलय् की भारतीय विशेषत: 'उच्चभ्रू' भारतीयांना कशाशीच काहीही घेणं नाहिये ! आणि निम्न-स्तरांतल्या गरीब जनतेला खरं तर, जगाला आदर्श वाटावा असा या भारतभूचा समृद्ध वारसां , उच्च संस्कृती, परंपरा माहीतही नाहीत किंवा त्या जाणून घ्यायला, रोजची भ्रांत भागवता भागवता वेळही नाही.*

*असो.. तरी पण...*

*भारत हा सर्वतोपरी एक 'गोंधळ' आहे. इतक सोपं वर्णन होवू शकतं, इथल्या एकुणातल्या (अ)व्यवस्थेचं... पण त्यांत सुद्धा गुंतागुंत आहे... सुरुवातीला आपण भारताचे चार मूलभूत प्रश्न बघू. ज्या 'चांडाळचौकडी'कडे, भारताला प्रगतीप्रत यात्रेला साखळदंडानं जखडून ठेवण्याची शक्ती आहे.. मग इतर कांही मुद्यांकडे वळू.*

*प्रदूषण.. माझ्या मते सर्वप्रथम याबद्दल बोलायला हवं. केरकचरा, पाऊस नसतांनासुद्धा ओल्या खरकट्याच्या कुजलेपणानं चिलटं,, डास, माश्या, झुरळं आणि पर्यायानं उंदिर, घुशी, पाली आदिंच्या प्रादुर्भावाला उत्थापन देणारा दमटपणा धूर ओकणारी वाहनं,*

काय 'वाट्टेल ते'....अगदी नर-जनावरंचे मृतदेहसुद्धा...टाकलेल्याआणि 'तरंग'रूपानं आपल्या दृष्टीस पाडणाऱ्या नद्या, नाले, 'उतून,उचंबळत' आपली वाट सोडून रस्त्यावरून वाहणारे सांडपाण्याचे. मल-मुत्राचे किळसवाणे, दुर्गंधीयुक्त 'ओघळ', विनाकारण केवळ विकृत आनंदासाठी वाजवले जाणारे कर्ण करकश 'भोंपू'..मला कळत नाही की हा कुठल्या संस्कृतीचा भाग असूं शकतो का पण या आधी मी तो कधीही आणि कुठेही अनुभवलेला नाही. पंचतारांकित विश्वकीर्त 'ताज' हॉटेल्च्या दरवाज्याला लागून, 'असह्य' दुर्गंधी, क्षणोक्षणी हवेंत उधळणारा टाकाऊ वस्तूंचा ढिगारा असावा ? हाय रे दुर्दैवा..बाहेर आल्यावर आंत घेतलेल्या, आदरातिथ्याचा 'ताज्'या अनुभवाला छेद देणारा हा 'अतिप्रसंग, पर्यटकांनी कां म्हणून सहन करावा ? कांही कमी प्रमाणांत पण दिल्ली, बंगलोर, चेन्नईंतही ह्या 'वातावरणा'मुळं मला शारीरिक त्रास...सायनस्, कर्णपटलावर दुष्प्रिणाम,, अपचन, पोटांत ढवळणे यासारखे..सहन करावे लागले. शेण.. मग त्या बकरीच्या लेंड्या असो की गाई-म्हशींच उत्सर्जन किंवा मानवी विष्ठा..हा एक 'सर्वदूर मार्गप्रदीप भारतीय' अनुभव. त्यांतून प्रेक्षणीय(?) स्थळां सभोवताली तर केवळ 'अवर्णनीय' अगदी शब्दश:..परिसर ! रस्त्यांच्या मधोमध मुत्र्या, संडास, ते सोडून इतरत्र 'उत्सर्जन' करू पाहाणारे बापडे, बाया... काय काय म्हणून सांगू ?

शहराच्या जरा बाहेर पडावं आणि ग्रामीण भाग लागावा तोंच आढळतांत प्लस्टिक्च्या पिशव्यांनी जवळजवळ 'तुंबलेले' रस्ते. रस्ते कसले हव्यातशा बांधलेल्या घरांच्यामधून दिसणाऱ्या पायवाटा. अन् हवेची शुद्धता ? शुद्धता कशाशी खातांत हे इथल्या हवेला अभावानंच माहिती असावं बहुधा ! वाहनं जो धूर ओकतांत त्यांतल कर्बाचं आणि शिशाचं प्रमाण हे इतकं घातक असतं की, ते किती हितकारी आहे या पेक्षा ते किती घातक आहे याचंच मोजमाप घ्यायला हवं. ग्रामवासीच काय पण शहरी ..'नागरी' जनतासुद्धा रस्त्यांवर हवा तो, तसा आणि तेंव्हा विविध प्रकारचा कचरा फेकत असतांत. .

*त्यांतल्या त्यांत दोन शहरं.. एक म्हणजे केरळ राज्याची राजधानी त्रिवेन्द्रम् आणि दुसरं कालिकत... ही त्यांतल्यात्यांत स्वच्छ आणि 'सुसह्य' वाटली. मला माहीत नाही, पण भारताच्या उत्पादक आणि उद्योजक शक्ती ताकद आणि क्षमता या सर्वांवर या सगळ्याचे दूरगामी परिणाम, जर परिस्थिती अशीच राहिली तर, निश्चित होतील. जुनाट, अनावश्यक, अडगळ सदृश परंपरांच्या आणि अंधश्रद्धेच्या विळख्यांत अडकलेल्या या देशाला. सर्वप्रकारचं प्रदूषणांतून मुक्ती कशी मिळणार हा एक मोठा प्रश्न आहे.*

*दुसरा महत्वाचा मुद्दा.. आवश्यक आणि अनिवार्य सुविधांची उपलब्धता. रस्ते, रेल्वे, बंदरं आणि विद्युतीकरण. विजेचा अखंड लपंडाव हा एक अत्यंत विनोदी आणि उद्विग्न करणारा प्रकार इथं अनुभवायला येतो. बहुतेक सर्व जनसामान्य त्यांनी किंमत मोजलेल्या विजेपासून दिवसेंदिवस वंचित असतात. त्याचा उत्पादकतेवर थेट परिणाम होऊन ती घटणारच ना ?*

*बंदरांमधली जुनाट, बाबा आदमच्या काळांतली कालबाह्य यंत्रणा, आधुनिक तंत्रिक सुधारणा झालेल्या जगांतल्या, 'कंटेनर्' ह्ताळण्याची क्षमता असलेल्या बंदरांशी कशी स्पर्धा करणार ?*

*रस्त्यांची अवस्थासुद्धा याहून कांही वेगळी नाही. माझ्या प्रवासा दरम्यान मी थायलंडमधे, जो देश युरोप आणि अमेरिकेच्या तुलनेंत खूप मागासलेला समजला जातो, तिथं फक्त, स्तरवृद्धी करून तयार केलेले, सर्वसामान्य रहदारीला बाधा न आणणारे. जवळजवळ दोनतृतियांश भूमीला सेवा देणारे असे द्रुतगती किंवा महामार्ग बघितले. आणि इथं ? एकेरी वाहतूक असलेले महामार्ग अभावानेच, वाहतूक नियमांची, जनतेनं केलेली 'ऐसी की तैसी', रहदारीच्या नियमांची अंमलबजावणी करण्याबाबतची प्रशासनाची उदासीनता. भ्रष्ट पोलिस-यंत्रणा, अंतर कापायला लागणारा तिप्पट वेळ, तीसतीस वर्ष जुन्या, देखभाल नसलेल्या, कार्बन्*

*मोनॉक्साइड्च्या विषारी फुफुसांना अत्यंत घातक धुराचे लोट आणि ऊष्ण बाष्फ ओकणाऱ्या बसेस्.. यादी कमी आहे ?*

*जो जो भारतीय, रेल्वेनं प्रवास करतो तो अत्यंत त्रासलेला असतो.. संतापजनक प्रकार असतो सगळा ! गेल्या पांच वर्षांत तर स्थिती आणखी बिकट झाली आहे, इतकी की पर्यायानं तिचा परिणाम मनुष्यबळाच्या क्षमतेवर आणि परिणामत: उत्पादकतेवर दिसणं अनिवार्य आहे. नुसती चौकशी करायला, खिडकीपर्यंत पोचायला अर्धा अर्धा तास घालवावा लागावा? चारचार, पांचपांच दिवस आधी आरक्षण 'तुडुंब'.. मग काय करणार ? बिचारे प्रवासी, त्या भयानक अवस्थेंतल्या 'बस्' नांवाच्या वाहनांत 'बस'तांत.*

*दररोज जवळपास पांच कोटी भारतीय आणि अन्य प्रवासी दाखल होतांत रेल्वेंत प्रवासहेतु ! पांचशे प्रवासी तर रोज प्रतीक्षा यादींत असतांत. रेल्वे ही सर्वसामान्य जनांना परवडणारी आणि उपल्ब्ध सुविधा आहे इथं हे मान्य करायलाच हवं. अन गर्दी? अबब! स्वस्तातल्या विमान प्रवासाच्या आजकाल, कुत्र्याच्या छत्र्यांप्रमाणे फोफावलेल्या संधींमुळे ज्यांना परवडतो ते विमानप्रवास करतांत आणि मग उरलेली परचूटन 'जनता' ?... ओथंबलेल्या रेल्वेच्या डब्यांतून अक्षरश: ढोरांसारखा प्रवास करते. पन 'कुणाला काय हो त्याचे ?'*

*रशिया, इज्रायल् आणि अमेरिकेकडून शस्त्रखरेदीच्या, फायदेमंद 'उपद्व्यापा'पुढे, या देशाचं, इतर बाबींबाबत 'मंद'गती होणार सरकार, इथल्या नागरिकांच्या कल्याणकारी योजनांबद्दल आणि त्यांच्या अंमलबजावणीबद्दल किती गंभीर, कटिबद्ध आणि इच्छुक आहे याबद्दल मी खरंच साशंक आहे.*

*शेवटचा आणि महत्वाचा मुद्दा, जो दोन भागांत विभागला जावू शकतो, ज्याला, एखाद्या नाण्याच्या दोन बाजूं सारख्या आहेत, तो म्हणजे नोकरशाही किंवा 'कचेरी'शाही आणि भ्रष्टाचार.*

*निवास व्यवस्थेसाठी तिप्पट रक्कम, भ्रमणध्वनिसुविधेचं SIM मिळवणं म्हणजे, लालफितीचा अतिरेक, कारण छायाप्रती, हे प्रमाणपत्र तो परवाना... अरे रे.. या सगळ्या जंजाळांतून कुणी डोकं शाबूत राहून बाहेर येन मुषकिल. अशी ही ग्राहक सेवेची कथा आणि व्यथा.*

*रेल्वेची तिकिटे मिळणे ? आणखी एक दुरापास्त अनुभव. गाडीचा क्रमांक शोधा ...तीस मिनिटे..मग अत्यंत 'अवधड' परीक्षेच्या प्रश्नपत्रिकेसारखा अर्ज भरा.. मग ती मारुतीच्या शेपटाप्रमाणे वाढत राहाणारी रांग... खिडकी पर्यंत पोचायला कमीतकमी आणखी अर्धा तास..आणि एक क्षुल्लक चूक.. तिथल्या कारकुनानं दाखविली की परत, 'येरे माझ्या मागल्या'.. रांग-शेपटा शेवटी !*

*सरकारला धनिकांच्या लांगूलचालनापुढे, किंवा स्वत: श्रीमंत होण्याच्या गडबडींत, सर्वसामान्यांचे प्रश्न जणू कांही जाणवत नाहीत किंवा ते त्यांच्याकडे काणाडोळा करतय्. उदाहरणार्थ, नगरपालिका धनिकवस्तींत स्वच्छतेच्या इतक्या सुविधा पुरविते की सामान्य वस्त्यांमध्ये जाण्यासाठी त्यांच्याकडे वेळ, मनुष्यबळ पैसा आणि सर्वांत शेवटी.. इच्छाशक्ती अभावानंच असते.*

*सरकारी पगारावर पोसणारे वैद्यकीय अधिकारी ग्रामीण रुग्णालयांत बहुश: हजर नसतांत कारण ते खाजगी व्यवसाय करण्यांत व्यग्र असतांत आणि रुग्णालयांत, सेवेकऱ्यांची संख्यासुद्धा पुरेशी नसते.*

*मी आणखी कांही काळ बदलाची वाट पाहाण्याच्या मताचा होतो पण इथल्या नागरिकांनाच कशाची खंत वाटत नाहीत आणि बदल करण्याची त्यांची मानसिकताही मला जाणवली नाही..*

*भारताची आर्थिक राजधानी मुंबई, म्हणजे घाणीचं साम्राज्य, जिथं गलिच्छ झोपडपट्ट्या,, गरिबी हे माणुसकीचे शत्रू सर्वदूर माजलेत. कल्पनेपलिकडच्या अशा व्हिएतनाम किंवा इंडोनेशियामधल्या शहरां(?) इतक्या किंवा किंबहुना जास्त. अतिप्रदूषित मेदान हे सुमात्रामधल ठिकाण पण सगळयांत मोठे उंदिर आणि घुशी मी फक्त मंबईतच पाहिले बुवा ! मागासलेपणा? मी समजू शकतो की जिथं नोबेल्पुरस्कार विजेते, अणुवैज्ञानिक, विख्यात अर्थशास्त्रज्ञ, समृद्ध उद्योगांचे जनक हे जन्म घेणं दुरापास्त आहे अशा ठिकाणी मला नवल वाटलं नसतं. पण भारतांत हे सगळं आहे आणि भारतियांनी हे सगळं मिळवलंय. पण अंतिम चित्र ? नुसतं धूसर नाही तर अंध:कारमय !*

*श्रीमंतांची कामं करायला गरीब आहेतच आणि ते गरीबच राहातायत त्यामुळं ही दरी अशीच वाढत जाणार, रुंदावत जाणार. भारताकडे आणि भारतीयांकडे जगाला देण्यासारखं पुष्कळ आहे... पण माझ्या आयुष्यांत हे 'देण' बघण्याची, भोगण्याची मनिषा कितपत राहील याबद्दल मी साशंक आहे.*

*मला तुम्ही हवंतर पाश्चिमात्य सांस्कृतिक सरंजामशहा म्हणा, किंवा वाया गेलेलं पोट्ट म्हणा, पण त्याच वेळी हेही लक्षांत घ्या की इथियोपियासह, जगांतले जवळपास पन्नास देश मी पालथे घातले आहेत एक पर्यटक म्हणून.. आणि कुठेही, इथल्याइतक्या तक्रारयोग्य बाबींची भलीमोठी यादी मी वाचल्याचं मला स्मरत नाही. आणि या सगळयाच्या मुळाशी आहे निष्क्रीय आणि अनिच्छासक्त आणि स्थितिप्रिय भारत !!*

*****

## कृष्ण.. 'इतिहास की पुराण ?'

"वेदकाळाच्या अखेरच्या कांही वर्षांत, श्रीकृष्ण हा एक ऐतिहासिक पुरुष अस्तित्वांत होता. पारंपरिक भारतीय पुरावे हे या विधानाला पुष्टी देणारे आहेत. पण पाश्चिमात्य वसाहतवादी आणि धर्मप्रसारकांनी मात्र या 'इतिहासा'ला वेगळं रंगवत त्याचा विपर्यास करण्याचाच सातत्यानं प्रयत्न केला.

'इतिहास की पुराण ?'

आपण सगळे भारतीय, आणखी एक कृष्णजन्मोत्सव साजरा करायच्या उंबरठ्यावर असतांनाच, एक प्रश्न, जो सगळयांच्याच मनांत खदखदत असतो: कृष्णकथा ऐतिहासिक की पौराणिक ? भारतीय हिंदूंच्या तृषार्त आत्म्यांची पोकळीं व्यापण्यासाठी कृष्ण ही निर्माण केली गेलेली केवळ एक प्रतिमा ? या प्रष्णांचा शोध घेण्याचा हा प्रयत्न...

एक आदरयुक्त प्रेम, ओढ, असोशी यांनी व्यापलेलं व्यक्तिमत्व म्हणून कृष्ण हे भारतीय परंपरा आणि इतिहास या मधे आजवर, अबाधित राहिलं आहे. वसुदेव-देवकीनंदन आणि यादवकुळाचा राजपुत्र असलेला कृष्ण, बहुतेक हिंदूंनी, विष्णुअवतार म्हणून ग्राह्य धरलेला असतो. पण आजच्या वैज्ञानिक आणि तंत्र्ज्ञानाच्या प्रगती नंतर, अगदी हिंदूंना सुद्धा, कृष्णाच्या खऱ्या अस्तिवा किंवा नास्तित्वाबद्दल जाणून घेण आवडेल. कृष्णाचं ऐतिहासिकत्व जाणून घेण्याची इच्छा, प्रक्रिया हे कांही नवल वाटण्याजोगं आहे असं मुळीच नाही. संशोधक-विद्वान गेली जवळपास दोन शतक या माहितीचा वेध घेताहेत. विशेषत:, जेंव्हापासून कांही युरोपीय संशोधक, लाखो-करोडो भारतीयांचा हृदयस्थ असलेल्या या प्रतिमा-परमेश्वराच्या

श्रद्धेचा मागावर आहेत. त्या संशोधकांनी निष्कर्ष काढला आणि त्यांना मानणाऱ्या कांही भारतीयांनी सुद्धा तो स्वीकारला.. की कृष्ण हा प्रत्यक्षांत कधीच नव्हता आणि तो केवळ एक काल्पनिक भाकड आहे. एक अत्यंय उथळपणे काढलेला आणि बेगडी विद्वत्तेची झालर लावलेला निष्कर्ष होता तो. पण आतां या लेखमालेंतून श्रीकृष्णाच्या ऐतिहासिकतेबद्दलचे आणि हा इतिहास लवळपास पांच हजार वर्षांपूर्वीचा कसा आहे, याचे पुरावेच वाचायला तुमच्यासमोर आम्ही ठेवणार आहोत.

महाभारत या महाकाव्यातल्या पात्रांबरोबरची त्या काळांतल्या दीडदोन शतकं असलेली श्रीकृष्णाची नाती, संबंध, संवाद जर आपण लक्षांत घेतले तर कृष्णाची ऐतिहासिकता आपोआपच प्रस्थापित होते, आणि कालखंडाच्या अचूकतेबद्दल म्हणायचं तर महाभारतांतल्या घटनाक्रमांचे उदाहरणार्थ युद्ध वगैरे.. नेमके दिनांक...तिथ्या म्हणूया हवंतर... निश्चित झाले की आपोआपच कृष्णाच्या आयुष्याच्या तिथी आपल्याला स्थूलमानाने प्राप्त होतील. आणि अशारितीनं कालखंडाची निश्चिती म्हणजेच त्याच्या ऐतिहासिकतेचा आणि पर्यायानं अस्तित्वाचा, पुरावा. जवळपास शतकभरापूर्वी, प्रसिद्ध बंगाली साहित्यकार बंकिमचंद्र चटर्जींच्या कृष्ण संदर्भांतल्या लिखाणांतून प्रकाशांत आलेल्या आणि पुतातत्ववेत्त्यांच्या संशोधनानं पुष्टी दिलेल्या बाबी मला मार्गप्रदीप ठरल्या आहेत.

कृष्णाचा मागोवा घेत असतांनाचे कांही पुरावे:

कृष्णद्वैपायन किंवा वेदव्यास म्हणजे  आपल्याला आज ज्या स्वरूपांत माहीत आहेत त्या चार वेदांच्या निर्मितीला प्रेरणाभूत असलेल्या व्यक्तिमत्वाची धाकटी पाती म्हणजे कृष्ण, एक वेदकाळांतली विभूती होती, असं भारतीयांकडे उपलब्ध असलेली माहिती सांगते. व्यास अर्थातच  अगदी प्रारंभीच्या आणि मूळ महाभारतकथेचे कर्ते. तुम्हाला आश्चर्य वाटेल पण या व्यासकृत महाभारतांतल्या कालखंडातल्या कांही पात्रांची नांव, उपलब्ध असलेल्या, पांच हजार वर्षांपूर्वीच्या, तत्कालीन लेखांमधून किंवा हरप्पनकालीन शिक्के यामधून  उजेडांत आली आहेत.उदाहरणार्थ, व्यास-शिष्य पैला, कृष्णाचा स्नेहसखा अक्रूर, वृष्णी, कृष्णाचे पूर्वज यादव, श्रीतीर्थ, म्हणजे द्वारकेची तत्कालीन संज्ञा, वगैरे.

या सगळया अभ्यासाला छेद देणाऱ्या कांही बाबी म्हणजे, अठराव्या शतकांतल्या, कांही 'विद्वानां'नी प्रसृत केलेल्या कल्प कथा.. म्हणजे आर्यांचं भारतीय भूखंडावरचं आक्रमण. सत्तर ऐंशी वर्षांपूर्वी जेंव्हा मोहंजोदरो-हरप्पाचं उत्खननं होवून प्राचीन अवशेष उजेडांत यायला लागले, तेंव्हा या 'कल्पकथे'ला आणखी एक पुरवणी जोडण्यांत यायला लागली, ती म्हणजे आर्य आणि द्रविड यांचं युद्ध. पुरातत्व संशोधनोत्तर, विज्ञानानं आता या दोन्हीही बाबी नाकारल्या आहेत. आपल्याला आतां माहीत आहे की हरप्पा संस्कृती वेदकालानंतर उदयाला आली. विख्यात व्याकरणकार पाणिनीच्या ग्रंथांत, महाभारतांतल्या अनेक पात्रांचा उल्लेख आहे. उदाह्रणार्थ: वासुदेव म्हनजे कृष्ण, अर्जुन, नकुल, कुंती वगैरे. वेदकालीन साहित्यकृतींमधे, महाभारतांतली पात्र जागोजागी आढलतांत.. कथकमधे विचित्रवीर्य, शिखंडी, कौशितकीमधे यज्ञसेन, ब्राह्मण, ऐतरेय ब्रह्मणमधे अभिमन्यूचा नातू जनमेजय आणि शतपथ ब्राह्मणमधे परिक्षित... आणि ही यादी न संपणारी आहे.

बौद्धिक साहित्यांतल्या कुणाल जातकामधे, भीमसेन, अर्जुन, नकुल सहदेव आणि युधित्तिल.. युधिष्ठिरचं पाली रूप.. यांच्या बरोबर, कृष्णा, म्हणजे द्रौपदीचाही निर्देश आढळतो. कुरु जमातीतला धनंजय आणि द्रौपदी यांच्या स्वयंवराचा उल्लेख धुमकरी जातकांत पाहायला मिळतो. याच कृतींत, इंद्रप्रस्थाचा युधिष्ठिर, कौरवांचा पूर्वज म्हणून, आणि विदुरपंडित यांचा उल्लेख आहे. शिवाय महाभारतांतली, कृष्णासह वर उल्लेखिलेल्या पात्रांचा उल्लेख, सूत्रपितक, ललितविस्तार आदि बौद्ध साहित्यकृतींमधे आढळतो. हा उल्लेख कृष्णा आणि त्याच्या उपदेशाबद्दल फारसा आदरपूर्वक किंवा निर्मळ नसला तरी, तो तिथं अनिवार्य म्हणून आलेला आहे हेंच मुळी, त्याच्या व्यक्तिमत्वाच्या ऐतिहासिकतेच्या स्वीकाराचं द्योतक आहे. त्या साहित्यकारांनी त्याचं महाभारतांतलं अस्तित्व नाकारलेलं नाही.

वेदांकडे परत एक दृष्टिक्षेप टाकतांना, छंदोग्य उपनिषिदामधे, कृष्णासंदर्भांत एक अत्यंत रोचक उल्लेख आढळतो. 'देवकिनंदन कृष्णाला घोर अंगिरस म्हणतो.. मला तुझ्या

आश्वासनांनी तृषामुक्त केलय’ आणि प्राण असेपर्यंत त्यानं फक्त, ’तू अ क्षत.. अविनाशी, अच्युत..कालातीत, आणि प्राण संहित,.. जीवनप्रवाह.. आहेस’ या त्रिसूत्रीचीच आराधना केली.

देवकीनंदन कृष्ण म्हणजे अर्थातच महाभारतांतील कृष्ण. भगवद्गीतेमधे नंतर कृष्णानं केलेला उपदेशाचं मूळ त्यानं घोर अंगिरसाकडून वेदांविषयीचं ज्ञान मिळवितांना, केलेल्या विश्लेषण, विचार, चर्चा, त्यातून विकसन पावलेल्या संकल्पना यांत असावं. गीता म्हणजे आपण सर्व उपनिषदांचा अर्क किंवा गाभ्याचा सांख्य तत्वज्ञानाच्या प्रकाशांत घेतलेला वेध म्हणू हकतो. आणि उल्लेखनीय बाब म्हणजे गीतेचं हे मूळ घोर अंगिरसाच्या शिकवणींत आहे हे एका हरप्पन लेखांत नमूद केलेलं आपल्याला आढ्ळतं.. तो संदेश असा, ’घोर: दाता: द्वयु: अर्क:, म्हणजे घोरानं दिलेले दोन घनपाठ.. पहिला उपनिषदं आणि दुसरा सांख्य तत्वज्ञान. म्हणून, भगवद्गीतेंत श्रीकृष्णानं सांगितलेल्या, वेदांत आणि सांख्य तत्वज्ञानाच्या संमीलनाचा शिल्पकार, ख्रिस्तपूर्व तीन सहस्रकाच्या कालखंडांत असलेला घोर अंगिरसच होता. महत्वाची नोंद घेण्याची बाब म्हेणजे हरिवंश किंवा भागवताप्रमाणे, उपनिषिदं, जातकं, सूत्र, किंवा ब्राह्मण ऐतिहासिक परंपरेचे भाग नव्हते. त्यामुळं नामोल्लेखांच कारण केवल केवळ, ती परिचित असणं एवढाच असूं शकतो. इतक्या विविध  कालखंडांत लिहिल्या गेलेल्या अनेक बहुआयामी ग्रंथांमधे जेंव्हा कृष्ण आणि महाभारतांतली इतर पात्र यांचा उल्लेख सर्वसंचारी असा उपलब्ध होतो तेंव्हा, त्यांच्या ऐतिहासिकतेबद्दल किंचितशीही शंका कुणी उपस्थित करूं नये.

आतां कृष्णाच्या अस्तित्वाच्या कालखंडाच्या अभ्यासाकडे आणि संशोधनाकडे पाहूं..

# कृष्णाचा कालखंड

पारंपरिक संशोधकांच्या मते, कलियुग सुरू झालं, ख्रिस्तपूर्व ३०१२ मधे. महाभारतीय युद्ध किंवा कृष्णाचं परलोकगमन यांच्याशी या कालगणनेंचा काय संबंध आहे हे स्पष्ट होत नाही आणि ते इथं महत्वाचंही नाही. त्यामधे साधारणतः ३५ वर्षांचा फरक आहे आणि इतक्या प्रदीर्घ कालावधीच्या आणि त्या दरम्यान घडलेल्या घटनांच्या तुलनेंत तो नगण्य आहे. अनेक महान खगोलशास्त्रज्ञ आणि कुंडलीकार भविष्यवेत्त्यांनी ग्रहगोलांच्या स्थानांच्या तौलनिक अभ्यासानंतर, दिननिश्चिती करण्याचा प्रयत्न केला आहे या आधी. प्राचार्य श्रीनिवासराघवन हे त्यापैकी एक महनीय नांव. त्यांनी, महाभारत युद्धाचा दिनांक ख्रिस्तपूर्व २२ नोव्हेंबर ३०६७ हा, निश्चितही केला आहे. पण यामधे, प्राचीन ग्रहस्थितींची नोंद अचूक असल्याच गृहित मानलं गेलय, जे सहजासहजी स्वीकारार्ह होणं जरा दुरापास्त वाटतं. म्हणजे याचा अर्थ त्यांचा होरा चुकीचा होता असं नाही. पण थोडा साकल्यानं विचार होणं आवश्यक आहे. कांही संशोधकांच्या मते, ख्रिस्तपूर्व ३१०० इतकं मागं जाणं बरोबर नाही कारण, आर्यांचा भारत प्रवेशच मुळी ख्रिस्तपूर्व १५०० मधला मन्यताप्राप्त असा आहे. आणि म्हणून महाभारतयुद्ध आणि कृष्ण हे साहाजीकच त्यानंतरचेच. परंतू भरतवर्षावरच्या आर्यांच्या आक्रमणाची शक्यता आणि मुळातच तो सिद्धांत विज्ञानानं नाकारला आहे. मोहंजोदरो आणि हरप्पातल्या उत्खनना दरम्यान मिळालेल्या लेखांची उकल करतांना, वेदांचा उगम हा ख्रिस्तपूर्व ३५०० वर्षांच्या बराच आधीचा आहे हे ही स्पष्ट झालंय. त्यामुळं हे होरे सहजी निकालांत निघतांत. एकमेव मुद्दा, ज्यावर चर्चा होवू शकते तो म्हणजे, विख्यात पुरातत्ववैज्ञानिक एस् आर् राव यांच्या संशोधनांतूल प्रकाशांत आलेलं. सौराष्ट्र किना-यालगत जलधिस्थ झालेलं द्वीरका बेट, जी, त्यांच्या मते कृष्णाचीच ख्रिस्तपूर्व १५०० वर्ष अस्तित्वांत असलेली द्वारका होय.. पण पुराभिलेखांच्या निरक्षरतेमुळे हे निष्कर्ष कितपत ग्राह्य मानता येतील या विषयी

मतभेद असू शकतांत. त्यामुळं आणि हरप्पा इथ सापडलेले पुराभिलेख, जे ख्रिस्तपूर्व १५०० पेक्षा जळपास १००० वर्ष मगच्या काळांतले आहेत त्या ऐतिहासिक पुराव्यावरून वरून, राव महोदयांनी शोधलेली द्वारका ही कृष्णाची नक्कीच नव्हे हे स्पष्ट होतं. आतां कांही वेगळ्या दिशेनं कृष्णकाळाचा शोध घेऊन पाहू.

अश्वलानं, महाभारताच्या ग्रंथकर्त्यांना, म्हणजे जैमिनी आणि वैशंपायन यांना प्राचीन असं संबोधलं आहे, त्या अर्थी महाभारतीय युद्ध आणि तो यांच्यांत किमान एक शतक इतका कालखंड गेला असणार असं गृहित धरायला हरकत नाही. त्यानं केलेल्या नोंदी प्रमाणं, पाऊस पडायला सुरुवात झाल्यावर, हिंदू पंचागातल्या भाद्रपदमासांत, जमिनीखालची बीजं अंकुरित होतांत. आज ही प्रक्रिया जेष्ठ किंवा आषाढांत होतांना दिसते. म्हणजे त्याच्या काळांत वर्षाऋतु आरंभ जेष्ठमासा ऐवजी श्रावणांत होत असावा, जसा तो आज होतो म्हणजे जवळपास सत्तर दिवस अलिकडे. पृथ्वीच्या ध्रूवीय बिंदूंमधून जाणा-या, आंसाच्या. सूर्य आणि इतर ग्रहगोलांच्या गुरुत्वाकर्षण परिणामी, अतिमंदगति पार्श्वगमनाच्या अवकाशी चमत्कारामुळं ऋतुंचंसुद्धा, स्थिर ता-यांच्या अवकाश-स्थानांच्या तुलनेंत, दर ७२ वर्षांनी एक दिवस या प्रमाणांत पार्श्वगमन होतं. आणि हिंदू पंचांग हे स्थिर ता-यांच्या अवकाश-स्थानांवरूनच मांडलं गेलय हे सर्वश्रुत आहे. याचाच अर्थ, अश्वलानं नोंदलेला वर्षाऋतु आरंभ हा ७० गुणिले ७२ म्हणजे जवळपास ५०४० वर्षांपूर्वीचा किंवा ख्रिस्तपूर्व ३००० वर्षांपूर्वींचाच आहे.

अश्वल हे कहोल कौषीतकी, या कौषीतकी ब्राह्मण वेदकालांतल्या तापसांपैकी ऋषींचे अनुयायी होते. ते महाभारतांतल्या अनेक व्यक्तिरेखांचा उल्लेख करतांत. शिशिरऋतुचा प्रारंभ म्हणजे आज आपण महाशिवरात्र साजरी करतो तो असाही उल्लेख दिसतो. परंतू शिशिरऋत्वारंभ २१ डिसेंबरला तर महाशिवरात्र १ मार्चच्य आसपास असते. हा परत एकदा पृथ्वीच्या ध्रूवीय बिंदूंमधून जाणा-या, आंसाच्या. सूर्य आणि इतर ग्रहगोलांच्या गुरुत्वाकर्षण परिणामी, अतिमंदगति पार्श्वगमनाचा परिणाम. म्हणजेच कौषीतकिच्या काळापासून, ऋतुचक्र ७० दिवस मागे गेले आहे, ५००० वर्षांपूर्वी. महाभारत युद्धाचं वर्ष हे ख्रिस्तपूर्व ३१०० याचा हा आणखी एक पुरावा.

अलेक्झांडरच्या आक्रमणानंतर आलेल्या कांही तत्कालीन ग्रीक प्रवाशांनी नमूद करून ठेवलेल्या बाबींप्रमाणे, आणि तत्कालीन उपलब्ध ऐतिहासिक दस्तऐवजानुसार, कृष्णाविषयी आणखी कांही रोचक माहिती मिळते. प्लिनी, हरि-कृष्णापासून नामोद्भवलेले हेरॅकल्स् असा उल्लेख करतो. ग्रीस मधल्या मॅथोरा नामक एका महत्वाच्या नगराच्या, सौरसेनी जमातीमधे हेरॅकल्स्.. कृष्णानुयायी.. हे बहुमानप्राप्त मानले जात. आपण त्यांना शूरसेनी आणि मथुरा असं संबोधू, कारण शूर हा वसुदेवाचा जन्मदाता म्हणजेच कृष्णाचा पितामह होता.

भारतीय हेरॅकल्स्.. कृष्ण.. ग्रीक उल्लेखाप्रमाणे, अलेक्झांडर आणि सॅन्ड्राकोटोस् यांच्या आधी म्हणजे अंदाजे इसवीसन ३३० पूर्वी, १३८ पिढ्या अस्तित्वांत होते. एक पिढी म्हणजे सामान्यतः वीस वर्षे असा, भारतीय साम्राज्यांच्या संदर्भांत अदाज केला, तर १३८ गुणिले २० म्हणजे २७६० अधिक ३३० म्हणजेच ख्रिस्तपूर्व ३०९०. कलियुगाचा आरंभ ख्रिस्तपूर्व ३१०० असा परंपरेने नोंदलेला, या आकड्यांच्या सर्वसामान्य गणितीय परिभाषेने किती तंतोतंत जुळतो ते पहा.

थोडक्यांत, तांत्रिक आणि अनेकविध स्रोतांमधून उपलब्ध प्रत्यक्षदर्शी पुराव्यांवरून आपण, परंपरेनं गृहित आणि मान्यताप्राप्त कलियुगारंभ हा सहाभारत युद्धाच्या अगदी समीपकाल अश्या निष्कर्षाप्रत अगदी सहज पोहोचू शकतो. आणि या भरपूर पुराव्यानं कृष्णाचं ऐतिहासिकत्व निर्विवादपणे सिद्ध होतं.

इति..

Prof. N.S. Rajaram

***

# आत्मरंजन

खरं म्हणजे आपण सगळे स्वप्नांत जगत असतो
कडू, आंबट, खारट तुरट पचनी पाडत असतो
कधीमधी आलीच जाग तर खरं जग दिसतं
भेदरून, घाबरून परत स्वप्नच पांघरावं वाटतं
गोड गोड स्वप्न कधी लागलच जर पडू
जरा त्याची नशा गंमत, लागलीच जर चढू
संसाराचा तव्यावरचं लागतं करपू कांही
बंड्या किंवा त्याची आई ओढत असते बाही
या असल्या जिण्याचा मग उपयोग काय ?
सोते हुए दोस्त मेरे, सपनेमे ही रह जाय

स्वप्न.. गतस्मृतींची नोंद घेणारी.. आणि कधीकधी, आगामी घटनांची नांदी असणारी..

आपण आपलं.. एक तर आठवणींना साखरेंत घोळून स्मरणरंजन तरी करावं किंवा अपुऱ्या आकांक्षांची पूर्तता भासमान करणाऱ्या स्वप्नरंजनांत लोळावं..पण रंजन मात्र जरूर स्वत:च स्वत:चं करून घ्यावं कारण आप्त-स्वकीय, स्नेहीजन, इष्ट मित्र-मैत्रिणी यांना आजकाल तुमचं रंजन करायला वेळ मिळेल ना मिळेल.. कांही सांगणं अवघड झालय्... कारण सगळं जगच मुळी 'फाष्ट' झालय् !

वैशाखाच्या काहिलीत पोळून निघाल्यावर, शरीराला आणि भेगाळल्या भुईची कासाविशी बघून हलधराच्या उसवल्या मनालासुद्धा कांही गारव्याची असोशी असते...

अशा वेळी 'ऐ उमडघुमडकर आयि रे घटा.. ' म्हणत आषाढाच्या पहिल्या सरींच स्वागत करतांना, 'दो आंखे, बारा हाथ' मधले, मुक्त कारावसांत, अंगातली गुन्हेगारी प्रवृत्तीची रग जिरवत, 'खळ'पणांतली 'व्यंकटी' सांडत, कांही कल्याणकारी कर्म हातून घडावं म्हणून, जमिनीची मशागत करतांना, झाकोळल्या आभाळाला बघून कैदीसुद्धा आनंदविभोर होतांत...

पण, तरुण्यानं मुसमुसल्या देहा-मनाच्या युवती-युवकांना, प्रौढ वयांत सुद्धा मनाची उभारी जपलेल्या सर्वसामान्य जनांना, एका दिशेकडून सुसाट वेगानं आलेल्या वावटळी पाठोपाठ, क्षणोक्षणी वृद्धिंगत होणाऱ्या घनगर्जनेच्या चाहुलीनं, अनिवार हुरहुर, अलवार प्रतीक्षा.. 'त्याच्या' आगमनाची... सुखावते आणि...

सौदामिनिचा लखलख झटका मेघ नगारे धरती

कोसळता अवनीवर श्रावण, आनंदाला भरती

व्रण सारे भरून येती,

दिठि-मिठींत पुरती मस्ती
हिरवे शालू ल्याल्या ललनांकरि
कांकणं किणकिणती.....

कुणि गाते मीलन गाणी,

कुणि शृंगारिक लावणी

रेखित, मिरवित रांगोळयांची

धरतीवरती लेणी.....

भादवा देइ चाहूल,

श्री, गौरिस माखु गुलाल

ढोल-नगारे घुमता नाचति

थिरकति वृद्ध आबाल.....

कुणि हिंदी चित्रपटातली नायिका, नायकाच्या आयुष्यांतलं आपलं स्थान, किती महत्वाचं आणि अढळ आहे आणि त्याच्याविना आपलं जगणं कसं सुन्सान आहे हे पटवून देण्यासाठी गाते 'हाय हाय ये मजबूरी ये मौसम और ये दूरी, तेरी दो टकेकी नौकरीसे, मेरा लाखोंका सावन जाए' (तकरार) तिच्या दृष्टीनं 'उदरभरणा'साठी आवश्यक 'नौकरी'सुद्धा, 'हृदयभरणा'साठीच्या प्रेमापुढं तुच्छ आहे.

अशा या श्रावणाची भुरळ, अनादिकालापासून आणि जेंव्हापासून कविगण काव्य 'व्यायला' लागले तेंव्हापासून, त्यांच्या (म्हणे) नाजुकसाजुक भावनांना न पडती तरच नबल !

आणि मग त्यावर, शब्दांना साजेसा स्वरसाज चढवायचं आव्हान समर्थपणे पेलत, संगीतकरांनी, अनेक अवीट गोडीची भावगीत स्वराकारून, मराठी सुगमसंगीताचं आणि एकूणच संगीताची दालनं समृद्ध केली.

श्रावणांत घन निळा बरसला, किंवा श्रावणातल्या त्या रात्रीची शपथ घालिते तुला (श्रीनिवास खळे, राम कदम) अजहुन आये बालमा...सावन बीता जाये, ( यांतली एक साऽऽ वऽऽ नऽऽ ही आरोहांतली मुरकी दिदींनी अशी कांही जिवंत करून सोडलिये.. क्या बात है !), बुंदिया बरसे सावन की..सावन की मन भावन की, निसदिन बरसत नैन हमारे...(६३-६४ आकाशवाणी...हृदयनाथ-दिदी) ही अजरामर गीत आपन विसरू शकतो ?, आणि, 'समुद्र बिलोरी ऐना...सृष्टीला पांचवा महिना', 'श्रावण लावण्य राग' आणि मग 'बांगड्या भराया..' (कविवर्य बाकीबाब बोरकरांच्या, स्वत:च्या शब्दकळेला स्वत:चा स्वरालंकार चढवलेल्या कविता) सणावाराच्या दिवसांत, 'माज्या गोव्याच्या भूमींत'महिलांची लगबग, कासाराच्या हातांत...विश्वासान आपल्या नाजुक 'कलाया' देणाऱ्या ललना.. कांही कांही म्हणून सोडलं नाही

बाकीबाबांनी श्रावण 'मांडतांना' !... शिवाय 'सावन का महीना, पवन करे सोर, जियरारे झूमे ऐसे जैसे, मनवामा नाचे मोर'... ही, वर्षानुवर्ष चहूबाजूंनी वरसणारी, स्वत: गुणगुणलेली, आणि त्यायोगे आपल्या आयुष्याच्या प्रसन्न भागाचा अविभाज्य भाग होवून, काळजाचे, तुकडे झालेली, कितीकिती म्हणून गीतं सांगावीत ?

हे शब्द स्वर, धमन्यांत घुमायला लागले की मग आपोआपच, माझ्यासारख्या नवश्यागवश्यांच्या भावनांना शब्दरूप देत, आधी ओठांत आणि मग कागदावर ढकलायला सुरुवात करतांत... अशीच सुच्ते कां कविता बिविता ? माहीत नाही बाँ !

पण उधृत करायचं धाडस करतोय्, सुचलेलं.. ! शब्दांच्या ऱ्हस्व-दीर्घांशी, कवीजनांवा, व्याकरणानं दिलेल्या मुभेचा.. Poetic License.. फायदा घेत..!

इथं 'श्रावणी' ही काव्यनायिका समजा..

आषाढातच विरहिणि झुरते, व्यथित श्रावणी 'तरसे' आज
आसुसलेपण सोनेरी क्षण, खळींत गाली, लपली 'लाज'...
पुसा तिला कारण हळुवार,
नको रुसाया नाजुक नार
अधिर बावरी, लाज लाजरी, मिलनसंधिची घुमते गाज...
डावी पांपणि लवते गं,
विरहज्वर जाळी अंगं..
हुरहुरते कळ मयूरपंखी, काळिज ? धडधडता पखवाज...
सवतीशी स्पर्धा आज,
योग अलिकडे हा रोज
करू कसा शृंगार-साज की भिडताक्षणि येइल मौज...
*****

# प्रेम-पुराण १

प्रेम.. शब्द एक, पण व्यक्त व्हायच्या पद्धती, प्रकार, देहबोली, शब्दकळा अनेक..

कविश्रेष्ठ, ज्ञानपीठ-पुरस्कार प्राप्तकर्ते कुसुमाग्रज त्यांच्या, 'प्रेम कुणावर कराव.' या गाजलेल्या कवितेंत म्हणतांत त्याप्रमाणे,

'ज्याला तारायचं त्याच्यावर तर करावंच,

पण ज्याला मारायचं त्याच्यावरही करावं..

प्रेम कुणावरही करावं..'

संपूर्ण कविता तर प्रेमाची महती सांगतेच पण त्यांतल्या या एका ओळींत, कविवर्यांवी, केवढा मोठा 'भाव-प्रदेश' कवळलाय् ?

या कवितेच्या अंतिम चरणांमधे तर कुसुमाग्रजांनी 'प्रेम-भावनेचं अधिष्ठानच प्रस्थापित केलय् !

ते म्हणतांत,

कारण, प्रेम आहे माणसाच्या संस्कृतीचा सारांश

त्याच्या इतिहासाचा निष्कर्ष

आणि..

भविष्यकाळातील त्याच्या अभ्युदयाची आशा..

एकमेव.....

आणि खंरच, तस बघितलं तर प्रेम-भावनाच निसर्गानं माणसाला बहाल केली नसती तर ? द्वेष, मत्सर, हेवेदावे, भांडणं यांचा जन्म झाला असता ?

या प्रत्येक भावाचं उगमस्थान म्हणून प्रेमाकडे पाहायला गेलं तर, उदाहरणं, दृष्टांत, रुपक लिहितालिहिता एकेक दीर्घ निबंध होईल.. पण मनाला एक बौद्धिक चाळा म्हणुन करून बघा ! गंमत म्हणून..

तर असं हे, सर्वपरिचित, सामान्य अर्थानं जगण्याच्या एका हळव्या वळणावर भेटणारं प्रेम..त्याच्या आगमनाच वर्णन, आमचे कविराज मित्र इतकं छान करतांत.. ते म्हणतात

दाटून आलेल्या संध्याकाळी, अवचित सोनेरी ऊन येतं

तसच कांहीसं..पाउल न वाजवता

आयुष्यांत प्रेम येतं...

सुधीर मोघेंची ही १९७७ साली ताजीताजी असलेली कविता, मी आजचे ज्येष्ठ-श्रेष्ठ संगीतकार आनंद मोडककडनं स्वरबद्ध करून घेतलिव्ती आणि युवदर्शनच्या गीतसंध्या कार्यक्रमांत सादर केलिव्ती ! मराठी पॉप् या शीर्षकांतर्गत. नंदू भेंडेनं ती गायली होती इतकी उत्कटपणे.. क्या केहेने.. आतां या प्रेमानं, अत्यंत प्रेम पूर्वक धमन्यांम्धे प्रवेश केल्यावर मग 'प्रेम-पात्रा'चं प्रणयाराधन.. त्यासाठी आजकाल CCD, तसं त्याकाळी एकांतस्थळं शोधणं होत असे..

शांताबाई शेळक्यांच्या शेलक्या रचनांमधली ही रचना

तोच चंद्रमा नभांत तीच चैत्र यामिनी

'एकान्ती' मजसमीप तीच तूहि कामिनी

चैत्र.. वसंतसखा चैत्र.. चित्तवृत्ती खुलवणारा-फुलवणारा, चेतवणारा चैत्र..तापल्या उन्हाच्या काहिलीला सामोरं जातांना, वृक्षांच्या शाखांतून उसळणारा स्राव दृश्यमान करणारा आणि निसर्गाचा हा आगळावेगळा मत्तगंध आभाळांत उधळणारा चैत्र..त्यांतली रात्र.. कधी हिंडलाय्त अशा रात्री ?

किंबा सागरकिनारीच्या, पुळणीवरच्या प्रणयरम्य घटिका सरल्यानंतर.. बा.भ. बोरकरांच्या शब्दांत

विरले सगळे सूर तरीही उत्तर रात्र सुरेल

ओसरल्यावर आपण सजणे, अशीच ओल उरेल

एक जलधिसान्निध्यांत वाढला पोसलेला कवी, किती सहजपणे आपल्या रोजच्या सृष्टींतलं रूपक.. सागर-कल्लोळ.. कल्लोळ म्हणजे लाट.. आणि किनारा यांचं.. देवून जातो पहा..

सग्ग्गळं अगदी तस्सतस्से असतं की नाही ?

पण याचं, अगदी समीप आलेल्या प्रमपात्रानं, नायकाचं प्रम अव्हेरलं, किंवा ती, कदाचित तिच्या मनाविरुद्ध, 'दुसऱ्या कुणाची झाली तर.. मग ?

दु:खाच्या वाटेवर गांव तुझे लागले

थबकले न पाय जरी, हृदय मात्र थांबले..

वेशीपाशी, उदास हांक तुझी भेटली,

अन् माझी पायपीट डोळयांतुन सांडली

सुरेश भटांचा शेर आणि सुधीर मोघ्यांनी स्वरावलेला आणि, श्रीकांत पांरगांवकरच्या सुरांनी भारावलेला...१९८१.. रंग माझा वेगळा, कार्यक्रमाची सुरुवात..

आतां या प्रेमाची परिणिती विवाह् बंधनांत झाल्यावर, अर्थातच नव्यानवलाईचे नऊ दिवस संपल्यावर, अहं त्याच्या आधीच, ताज्याताज्या नवरदेवांवर 'प्रसंग' गुदरतांत, आधी किरकोळ कारणानं रुसवे-फुगवे, धुसफुस, अश्रुपात, आणि मग मनधरणी..

कशि तुज समजाउ सांग

कां भामिनि धरिशि राग

बाकिबाबांच्या संस्कृतोद्भव शब्दकळेनं सजलेली ही कविता... ज्याचं बुवांनी..पंडित अभिषेकींनी शुद्ध कल्याण रागांत बांधलेलं, एक अप्रतिम गीत करून गायलय्... ती कविता या प्रेम प्रदेशांतल्या एका अवघड वळणाचं.. घडता घडता बिघडलेलं आणि बिघाडावर शरणागतीची धाड घालून, पुनर्घडण करू पाहाणाऱ्या परिश्रमांचं.. यथार्थ दर्शन घडविते.

याचं शृंगारकाला दरम्यान, म्यान केलेल्या कुरबुरी लपवत आणखी एक शरणागती.. मानापमान नाटकांतली

प्रेम सेवा शरण, सहज जिंकी मला,

मीच चुरीन चरण, दास हो मी तुझा

कृष्णाजी प्रभाकर खाडिलेकरांनी, १९११ मधे लिहिलेल्या संगीत मानापमान या नाटकांतलं, मास्टर दीनानाथांनी संगीतबद्ध करून, गाऊन 'Once more' घेत, लोकप्रिय केलेलं हे पद. याची मूळ चाल गोविंदराव टेंब्यांची तितकीच श्रवणीय..

आणि मग रागेजल्या भामिनीला आवरतांना पतिराजांची तारांबळ.. अशीच, प्रेमाचा आणखी एक आयाम धसमुसळ प्रेम, दर्शविणाऱ्या पदांत

नच सुंदरि करु कोपा.

मजवरि धरि अनुकंपा

कुचभल्ली वक्षाला

टोचुनि दुखवी मजला

धरुनीया केसाला

दंतव्रण करि गाला..

हाचि दंड योग्य असे सखये मत्पापा..

अरे काय प्रेम की मारामारी ? हो, मारामारीचं पण प्रेमोद्भव..

तर, अशा या प्रेमाचं व्यक्त होण्याच्या कांही नमुने तुमच्यासमोर मांडतांना मजा आला मला.

पण अजून आपण या युगुल-प्रेमाच्या टप्प्यापर्यंतच पोहोचलो आहोंत, हे लक्षांत आलय कां तुमच्या ?

अजून त्याला परिणामोत्तर, तिसरा आयाम प्राप्त व्हायचाय..

त्यानंतर हा प्रेम प्रवाह कुठल्याकुठल्या उताराकडं धावतो ते पाहू..

सुरुवातीलाच प्रेम-व्यक्ततेसाठी देहबोलीचा उल्लेख पाहिला. या देहबोलीचाच भाग म्हणजे, नर-नारी(सामान्यत:) प्रेमांत पडायच्या आधीची अवस्था..नजरबंदी. आधी नजरबंदी आणि मग स्वामित्वाच्या हव्यासापोटी ’नजर-कैद’ ’ति’ची किंवा ’त्या’ची

आधी ’डोळयांत वाच माझ्या, तू गीत भावनांचे’ आणि मग लगेच, Wishful thinking,

तू नजरेने 'हो' म्हटले पण वाचेने वदणार कधी ?

कर पडलेत गळयात तुझे पण वरमाला पडणार कधी ?

वगैरे ओघानं आलंच..

असंच असतं प्रेम.. अधीर, निलाजरं तरी लाजरं, बावरं, आसुललेलं.. आतां आसुसलेलं शब्दाचा आसु हा अविभाज्य आहे की नाही.. मग त्याची पण तयारी ठेवावी लागते प्रेमींना बरं ! मग शेर बोलायला लागतांत’

बोझ होता जो गमों का तो उठा ही लेते

जिंदगी बोझ बनी हो तो उठायें कैसे ।।

बोझ, गम.. प्रेमभम्गाचा.. म्हणजे आसूं आलेच की हो !

नैना बरसे रिमझिम रिमझिम

पिया तोरे आवन की आस..

वगैरे..

या नजरबोलीचा उपयोग कांही प्राणीसुद्धा, वेगबेगळ्या भावना व्यक्त करण्यासाठी करतांत, पण आपण सध्यातरी फक्त प्रेमभावनेचाच विचार करूंया !

ज्ञानदेवांच्या एका अभंगांत..

देहा लाजिलिये, शब्दा रुसलिये ।

कासवीचे दूध देवोनिया बुझविले माय ॥

काय सांगो तिचा नवलावो, ।

महालोभेविण कैसा येतो पान्हाओ ॥

कासवी आपल्या पिलांना, नजरेंतून वात्सल्य, अभय, आश्वासनरूपी दूध देवून त्यांचं संगोपन करते अशी एक समजूत आहे. कूट अभंगांतला हा अभंग मला, प्राचार्य राम शेवाळकरांनी निवडून दिलाव्ता, एका अल्बम्साठी. त्याच अभंगांतल्या अखेरच्या ओवींत

'आवसेचे चांदिणे' असा उल्लेख आहे आणि तेच त्या अल्बम्‌चं शीर्षक आहे. त्यांतला हा अभंग मी स्वरबद्ध केलाय आणि देवकी,, देवकी पंडितनं तो गायलाय्‌ !

ते कशाला ? गाईच्या डोळयांत नेहमीच एक वात्सल्य मिश्रित करुणा दिसतेच की! प्रेमाचाच प्रकार.. वात्सल्य.. वत्साप्रत.. छकुल्याप्रत..पुत्राप्रत.. उसळणारा, ओसंडणारा प्रेम-स्रोत..करुणोद्भव पान्हा..

कविवर्य माणिक गोडघाटे तथा 'ग्रेस'ची ओळ आठवा,

'गाइचे डोळे, करुण उभे की सांज निळाईतले'

हृदयनाथ मंगेशकरांनी स्वरबद्ध केलेल्या,

'वाऱ्याने हलते रान, तुझे सुनसान, हृदय गहिवरले'

या गीतांतली ही पुढची ओळ. १५ ऑगस्ट्‌ १९८६.. लक्ष्मी क्रीडा मंदिरामधे, आमच्या 'आनण्दघन' या कार्यक्रमांत, बाळासाहेबांनी ते गीत गायलं. माझ्याकडे आहे त्याची चित्रफीत.

चिमुकल्याच्या चिंतेत, काळजींत अतीव प्रेमापोटी, तन-मनानं एकरूप झालेल्या 'माय'च्या पाठीलासुद्धा डोळे असतांत. मग ते अंगणांत जावू लागलं की तिचा जीव घाबराघुबरा होतो, कुठं पडेल झडेल म्हणून. कवयित्री इंदिरा संतांनी बाळाची वांछा आणि आईच्या जिवाची घालमेल, त्यांच्या बाळ उतरे अंगणी.. या कवितेंत व्यक्त केली आहे...

अशा या, तळहातावरच्या फोडासारखं जपून लहानाची मोठी केलेली मुलं जेंव्हां,

पिलांस फुटुनी पंख, तयांची घरटी झाली कुठेकुठे,

आतां आपुली कांचन संध्या, मेघडंबरी सोनपुटे

अशी मोकळ्या आवकाशांत झेपावतांत.. आणि उरतांत मग वृद्धावस्थेंतली दोघं... वर्षानुवएष आनंदाचे, संघर्षाचे, संकटांचे प्रसंग एकमेकांच्या साथीन निभावतांना, मुरलेल्या लोणच्यासारखं प्रेम मिठीमधे कवटाळून. त्यांतून कांही कारणानं तात्पुरतं दुरावायला लागलंच तर मग कांसाविशी आणखीच वाढते. अण्णा.. अण्णा माडगुळकरांनी ती हृदयीची साद किती छान आणलिये, 'ऊन पाऊस' या चित्रपटांत ! वृद्ध नायिका म्हणते..

'या कातरवेळी.. पाहिजेस तूं जवळी..'

या जवळिकींतली कोणा एकाची साथ सरते आणि मग आयुष्य रिकामं भासायला लागतं, नजर तासनतास शून्यांत लागत असते. काय असतं तिकडं ? पैलतीर ? त्या तीरावर परत सहजीवनाची आंस घरणारा जीव, ऐहिकांतला सहचर किंवा सहचरी, येरे येरे पावसा.किंवा येगयेग सरी गात उभे असतांत ?

पण तिकडं जायचं म्हणजे इथले पाश सोडून, बंधमुक्त होवून, बाकीबाबांच्या शब्दांत त्या मृत्यू-प्रेमामुळं म्हणांवसं वाटतं

आंता माझ्या व्यथा कथा कुणा न येती सांगता

वृथा त्यांना कां दूषणं,  ना ये मला सांगता

आणि अखेरीस,

विझवून दीप सारे मी चाललो निजाया

आतां अशाश्वताची उरली मुळी न माया...

काय गंमत आहे पाहा. ते सगळं शाश्वत, आयुष्यभर उपभोगून झाल्यावर, मग आपण, 'विश्वामित्री पवित्रा घेवून, 'इदं न मम' म्हणायला तयार असतो ! कृतघ्न.. मनुष्यसुलभ.. हो की नाही ?

या शिवाय इतरही नातेसंबंधातलं 'प्रेम' म्हणजे उदाहरणार्थ

भ्रातृप्रेम.. भरत, श्रीराम यांच्यांतलं...परत गदिमांची आठवण अनिवार्य आहेच, कर्तव्यप्रेमापोटी सिंव्हासन अव्हेरणारा राम, भरताला सांगतोय

'पराधीन आहे जगती, पुत्र मानवाचा'

हे कर्तव्यप्रेम की दैववादामुळं निर्माण झालेली हताशा? कारण रावणमर्दनानंतर, आयोध्येंत, स्वत:च्या नीरक्षीरविवेकी राजा, या प्रतिमा-प्रेमापोटी सीतेला विजनवासांत धाडणाऱ्या रामाचं प्रेम कुठल्या चौकटींत बसवायचं ?

मधुराभक्ती..राधेची, माई माई.. तुम बिन कैसे कैसे जिऊ री म्हणणाऱ्या मीरेची... हे प्रेमच..

अतिथीप्रेम.. चिलियाबाळाची आहुती अतिथीचा जठराग्नी विझवण्यासाठी.. प्रेमच !

सत्ताप्राप्तीसाठी कैकयीचं, भरताचं अगदी स्वाभाविक पण फारसं कल्याणकारी जरी नसलं.. पुत्रप्रेम... तरी प्रेमच..

सौंदर्याचं प्रेम(?) स्वत:च्या भोगलोलूपते-लालसेपोटी... रावणाचं..

भिक्षुकाच्या वेषांत आलेल्या देवाधिदेव इंद्राला, शिधा द्यायला आलेली

न्हाउनी, उभे लाउनी येशि सुस्नात

हाल करतेस, झटकुनी केस, वीज मगजांत

नितळ कृश पोट, पन्हाळी पाठ, ओलसर ओठ

निरि धरी छातिशी, वरी, कटीशी गाठ

झाकता उभारी, वस्त्रे अपुरी अंगा,

ही नार करी बेजार, थांबवा दंगा

कांति सावळी, गालि अवखळी,खट्याळी खेळे

चंचला नजर, करि ठार भाबडे भोळे

विखारी रात्र, अनावर गात्र, तांब नजरेंत

विरहाचि आग, काळजी, राग, हुर्दात..

अशा अवस्थेंतया माझ्या स्वरचित लावणींतल्या लावण्यवती सारखे निसर्गालंकार लेवून आलेली यजमानीण पाहून, भरती आलेलं शारीर जरी असलं तरी शेवटी प्रेमच ना?

*****

# प्रेम-पुराण २

प्रेम-पुराणाच्या या अंतिम अध्यायांत मी माझ्या वाचकांना, अरविंद गोखल्यांच्या एका अप्रतिम कथेची आठवन करून देणार आहे .

विघ्नहर्ती...

एका वृद्धेनं, आपल्या कुटुंबातल्या लग्नसमारंभाप्रसंगी पाळलेला संयम.. व्वा..व्वा.. !

पतिप्रेम... सावित्रीचं सर्वदूर परिचित आहे पण विघ्नहर्ती ची नायिका.. ती सगळी उत्कटता तोडून-फोडून एक नवं क्षितिज दृश्यमान करते

आणखी दोन प्रेम प्रकारांच्या ओळखीसाठी मी इथं, दोन कथा उधृत करणाराय् !

पहिली, समवेदनेपोटी प्रेम...मैत्र जीवांचे..प्रेमाला कसले मोल

'प्रेम, म्हणजे प्रेम म्हणजे प्रेम असतं

तुमच आमचं अगदी 'सेम्' असतं'

कविकुलदीपकांच्या मांदियाळींतले एक अग्रणी वारकरी, वीणेकरी आदरणीय मंगेशजी पांडगांवकरांच्या कवितेंतल्या या लोकप्रिय ओळी..'प्रेम' ला 'सेम्' चं यमक अगदी 'फिट्ट्' बसलय...

सगळं ठीक आहे...पण..

’तुमचं आमचं सगळयांच ’प्रेम’ अगदी ’सेम्’ असतं कां हो ? आईचं मुलांवर, पतीचं पत्नीवर, आणि मैत्रीणीचं मित्रावर, किंवा उलट्या क्रमानं(विवाहपूर्व..अर्थातच), शेतकऱ्याचं पिकावर, शिक्षकांचं विद्यार्थ्यांवर...सगळी सारखी ’प्रेमं’ असतांत ?

या प्रत्येक ’प्रेम-प्रकारां’वर एक स्वतंत्र लेख होईल इतकी ती भिन्न असतांत

याच ’प्रेम भावनेचा एक अनोखा प्रकार आहे पुढे वाचाल त्यां गोष्टींत

तर...

एका कृषिवलाच्याघरी पाळलेल्या कुत्रीनं एक दिवस कांही गोडगोड गोजिरवाण्या बछड्यांना जन्म दिला. आपल्याचसारख्या, परिसरांतल्या सहकाऱ्यांना कदाचित ही पिलं पाळता येतील आणि घराच्या घरपणाला रात्रीसुद्धा ’जागत’ ठेवणारा सवंगडी मिळेल या हेतून, कृषिवलानं कुंपणाबाहेर एक सूचना-फलक लावायचं ठरवलं. तो फलक कुंपणाच्या दाराला लावत असतांनाच त्याला जा्णवलं की आपला सदरा कुणीतरी मागून ओढत आहे. कृषिवलानं मागे वळून बघोतलं तर त्याचा गुढग्याशी एक छोटा त्याला दिसला.

’काका, मला एक पिलू द्या ना...विकत !’ छोटा म्हणाला,

’बेटा, ही पिलं फार उच्च जातकुळीची आहेत. बरीच किंमत मोजावी लागेल तुला. आहेत का एवढे पैसे तुझ्याजवळ ?’ कृषिवलानं आपल्या कपाळावरचा घाम पुसत छोट्याला विचारलं..

छोट्यानं निराशेनं खाली मान घातली सुरुवातीला पण क्षणभर थांबून, एक हात विजारीच्या खिशांत घातला आणि मूठभर नाणी काढली. वर पाहात, आशेने ती मूठ शेतकरीकाकांकडे करीत उघडली त्यानं,

’काका माझ्याकडे हे एवढेच पैसे आहेत. मला कमीतकमी पाहू तरी द्या ना त्या पिलांना..’ विनवणी करीत उच्चारला छोटा

'गड्या, एवढं जर मी केलं नाही तुझ्यासाठी तर मला तो' वर आभाळाकडे पाहात दादा म्हणाले, 'क्षमा करेल कां ?' आणि चटकन शीळ घालीत त्यानं श्वानमातेला साद घातली. तत्क्षणी मागे दुडूदुडू धावणाऱ्या चार कापसाच्या गुंड्यांसह बाहेर दाखल झाली श्वानमाता..

'ती पाहतांच बाळें, काळीज धन्य झाले' अशी अवस्था, कुंपणाच्या कांटेरी तारेला अगदी चिकटून, पिलांना निरखणाऱ्या छोट्याची झाली...डोळे आनंदानं भिरभिरू लागले, मनांत खुशीचा मोर, पिसारा फुलवायला लागला...आणि तेवढ्यांत त्याच लक्ष श्वान-सदनाकडं गेलं..आंतमधे कांहीतरी हालचाल दिसली त्याला

आणखी एक कापसाचा गोळा पाठोपाठ बाहेर येत होता, हळूहळू चालत..किंवा खुरडत म्हणा हवंतर..बाकीच्या आपल्या भावंडांना गाठण्याची धडपड करीत..

छोट्याचे डोळे आणखी आनंदानं विस्फारले गेले. आणि तो उच्चरवांत, त्या पिलाकडे तर्जनी दाखवत, मागणी मांडू लागला...

'काका मला तेच हवय..सगळयांत शेवटी आलेलं..'

शेतकरीदादा, छोट्याच्या शेजारी बसत, थोड खंतावत म्हणाले, 'बेटा, नको नेवूस त्या पिलाला घरी. ते कधीच खेळू किंवा पळू शकणार नाही तुझ्या बरोबर, या बाकीच्या पिलांसारखं !'

छोटा दोन पावलं मागे सरकला, खाली वाकला, आणि आपल्या विजारीचा एक पाय वर गुंडाळू लागला..

आणि दृश्यमान झाला एक दैवदुर्विलास...छोट्याच्या विजारीच्या गुंडाळलेल्या पायाआड होता एक पंगू पाय दोनही बाजूला खास बनविलेल्या आधाराच्या पोलादी पट्ट्या लावलेला...' काका, अहो मलातरी कुठं धावता येतंय इतरांसारखं. मी पण तरीसुद्धा खुरडत राहातोच की सवंगड्यां मागे त्यांना गाठायच्या प्रयत्नांत.. मला असाच माझ्याबरोबरीचा एक नवा सवंगडी सापडेल ना, या कापसाच्या गोळयांत..! आणि त्याला पण, या,

आपल्याबरोबरच्या अपंग, बलहीनांना मागे सोडत धावणाऱ्यांच्या जगांत सांभाळणारा, त्याला समजून घेणारा, त्याच्या जगांतला आणि जगण्या-जागण्यांतला कुणीतरी हवांच की हो काका..!'

शेतकरीदादा, पांपणीकांठावर सांकळलेल दहिवर सदऱ्याच्या बाहीनं टिपत, छोट्यापासून नजर लपवत खाली वाकले. त्या पिलाला उचलून त्यांनी पोटाशी धरलं आणि, रुद्ध कंठांतून शब्दफुटेनासा झाल्यामुळं थबकले क्षणभर..

पण परत भानावर येवून, मंद स्मित करीत, ते पिलू त्या छोट्याच्या हातांत देवू लागले..

छोट्यानं पण, लगेच पिलाला हातांत घेवून कुरवाळत छातीशी धरलं. पिलू सुद्धा, त्याच्या इवल्याश्या लालचुटुक जिभेनं छोट्याचा खुललेला चेहेरा चाटायला लागलं...

जगांतल्या सगळया वात्सल्यमूर्तींनी हेवा करावा असं दृश्य साकार होत होतं तिथं त्या क्षणी...

डबडबल्या डोळयांनी,पण अत्यंत आनंदित स्वरांत छोटा शेतकरीदादांना प्रश्न करता झाला..

'किती पैसे देवू दादा मी याचे ?'

शेतकरीदादाच्या 'काळजात' चर्र झालं..गळयांत दाटलेला हुंदका बड्या मुश्किलीनं दाबत शेतकरी दादा म्हणाले,

'अंहं.. कांही देवू नकोस मला...खूप दिलंस तू आतांच आम्हा दोघांना, मला आणि या दुर्दैवी जीवाला...प्रेम-वात्सल्य-माया-ममता यांची पखरण करीत. यापेक्षा अधिक मूल्यवान कांहीच नाही बाळा या जगांत...'

आंसवं, नेत्रगामी व्हायच्या आधीच शेतकरीदादांनी, झटकन पाठ फिरवली आणि ते जड अंत:करणानं घराकडे चालायला लागले...

हा मजकूर लिहितांना माझीसुद्धा अवस्था जवळपास त्या शेतकरीदादा इतकीच बिकट झाली होती...

प्रेमाला कसले मोलं, स्पर्शाला उजवा कौलं
ही मधुभावाची भूल, निष्पाप वेलिवर फूल
प्रेमांत नसे हव्यास, बरसतो जसा पाऊस
निरपेक्ष देवुनी कांस, निष्पर्णा देई जोश
प्रेमाने फुटति धुमारे, प्रेमांत नसति देव्हारे
मागते प्रेम क्षण सारे, पत्र मात्र ठेवुनि कोरे
प्रेमांत नसे कुरघोडी, सहजीवन असते गोडी
शब्दांची भाषा थोडी, आवंतण नजरचं धाडी
हे असे विश्व मायेचे, स्नेहाचे, अनुबंधांचे
खोट्या नात्यांपलिकडचे, अन् विशुद्ध आनंदाचे
*****

आणि ही दुसरी..वात्सल्यकथा... दुसऱ्या महायुद्धातली परिचारिका

तुम्ही ओळखता या महिलेला ? अवघड आहे. कारण तशी फारशी प्रसिद्ध नसलेली ही व्यक्ती आहे.

इरिना शेन्ड्लर्. दिनांक १२ मे २००८ रोजी, वॉरशॉ, पोलंड इथं ती निवर्तली...

दुसऱ्या महायुद्धाच्या ऐन धुमश्चक्रींत, इरिनाला, वॉर्शॉमधल्या घेट्टोमधे पाणीपुरवठाविभाग आणि मलनि:सारण विभाग यामधे काम करण्याची परवानगी मिळाली

इरिनानं तिथल्या ज्यू नवजात तान्ह्यांना, स्वत:च्या कामासाठी लागणाऱ्या छोट्या हत्यारांच्या पेटींत लपवून, छळछावणीच्या नरकांतून 'बाहेर काढण्याचं पुण्यकृत्य सुरू केलं.

थोड्या जास्त वयाच्या बालकांना एका मोठ्या ताडपत्रीच्या किंवा डांबरी कापडाच्या पिशवीची योजना करून, ती पिशवी, ती मालवाहू वाहनाच्या मागील भागांत ठेवून बाहेर काढू लागली.

ज्यांना जर्मन फौजांच्या अत्याचारांची कल्पना वाचनांतून किंवा चित्रपटांतून समजली असेल त्यांना पटेल की हे किती जिकिरीचं, जोखमीचं आणि ’जीवघेणं’ काम होतं.

एखादं काम करायचं मनावर घेतलं की माणसाला, त्यांत येणाऱ्या विघ्नांवर मात करायचे उपाय आपोआप सुचूं लागतांत. म्हणतांत ना,

गरज ही शोधाची जननी आहे’..तसंच कांहीसं

ह्या लहान तान्ह्यांच्या आणि बालकांच्या रडण्या-ओरडण्याचे आवाज, नाझी सैनिकांच्या कानावर पडू नयेतं यासाठी इरिनानं एक शक्कल लढविली. तिची कृती अशी होती: तिनं चक्क एक भला मोठा कुत्रा पाळला आणि त्याला नाझी सैनिकांवर जोरजोरांत भुंकण्याचं प्रशिक्षण दिलं. घेट्टोच्या फाटकांतून ये-जा करतांना या भु:भु:च्या ठणाणा गर्जनेमध्ये मुलांचे आवाज लोप पावू लागले आणि ’तस्करी’ सुलभ व्हायला लागली.

या, अद्वितीय, माया, ममता, वात्सल्य, माणुसकीचं प्रेम या सर्व भावनांची अतुलनीय परिसीमा गाठंत या जगन्माउलीनं, तब्बल २५०० ’अंकुरां’ना, ’जगण्याच्या’ मुक्त आकाशांत झेप घेण्यासाठी अलगद सोडून दिलं.

पण...अखेरीस एक दिवस ती, त्या क्रूर, नराधम नाझी सैनिकांच्या कराल दाढांत गवसली हे ’पुण्कृत्य’ करतांना ! त्या यमदूतांनी तिचे दोनीही हात, पाय मोडून, जायबंदी करून तिला यथेच्छ मारहाण केली. मात्र, इरिनानं अत्यंत दूरदृष्टीनं आणि हुशारीनं एक महत्वाचं काम केल होतं. तिनं, छळछावणीबाहेर काढलेल्या सर्व लहानग्यांच्या माहितीची सूची एका कांचेच्या बाटलींत घालून, ती बाटली, तिच्या घराच्या परसांतल्या एका झाडाखाली पुरून ठेवली होती. युद्ध संपल्यावर, तिनं या, निराधार (?) मुलांच्या बचावलेल्या आई-वडिलांचा शोध घेवून,

त्यांचं त्यांच्या चिमुकल्यांशी ’हृदयंगम’ मिलाप सुद्धा धडवून आणला..बरेचसे पालक, छळछावण्यांमधल्या ’गॅस्‌चेंबर्’चे बळी झाले होते. त्या मुलांच्या संगोपनाची जबाबदारी कांही ’दयाबुद्धी’ कुटुंबांनी स्वीकारली, किंवा दत्तक घेतली गेली.

इथं ही साठा उत्तराची कहाणी संपते...

आणि मग सुरू होते, राजकारण्याची गुलाम झालेल्या प्रवृत्तींच्या, संस्थांच्या, ’कीव’ यावी अशा मानसिकतेची ’निर्लज्ज’ कहाणी...

२००७मध्ये इरिनाला ’नोबेल् शांतता पुरस्कारासाठी नामांकित केलं गेलं. पण त्या वर्षी, अल् गिर्‌ना, एका Global Warming वर आधारित ’स्थिरचित्र प्रदर्शना’साठी तो पुरस्कार मिळाला.

नंतर, कांही वर्षांनी, बराक् हुसैन ओबामा नावाच्या एका राजकारणी धुरंधर गृहस्थांना, हा पुरस्कार, सामाजिक समन्वयाच्या कार्यासाठी मिळाला.

’अरे मानसा मानसा.. कधी व्हशील मानूस ?

’ह्या एका छोट्याशा संदेशांत सामावलय माझा खारीचा वाटा.

तुम्हीसुद्धा असंच कांही कार्य कराल अशी आशा करते.’

युरोपांतलं दुसरं महायुद्ध सरून आतां जवळपास ६५ वर्ष होत आली.

जुलमी नाझी राजवटीच्या, छळवाद, रक्तपात, बलात्कार, अत्याचार, निर्घृण हत्या यांना बळी पडलेल्या सहा लाख ज्यू, दोन लाख रशियन आणि दहा लाख ख्रिश्चनधर्मियांच्या वतीनं, त्यांच्या स्मरणार्थ हा मजकूर उधृत करीत आहे. कां ?

तर भविष्यांत असले ’आगडोंब’ उसळले तरी कुठेतरी’ कुणीतरी, ’दयार्णवा’च्या रूपांतली ’इरिना’ उभी आहे याची खात्री बाळगा.’

******

## वैनतेय

बिन लादेनच्या अल् कायदा या अतिरेकी संघटनेनं.. बलाढ्या अमेरिकेच्या सर्वसामान्य नागरिकांवर, १२ वर्षांपूर्वी, एका सकाळी ऐन गर्दीच्यावेळी लादलेला निर्घृण अतिरेकी हल्ला.. आठवतो..? हा प्रश्न विचारणंच मुळी, त्या घटनेन हळव्या झालेल्या, उद्विग्न, उध्वस्त काळजांवर मानसिक अत्याचार आहे..

विश्वातल्या, उत्क्रांतावस्थेंतल्या माणसाच्या इतिहासांतला, ९ सप्टेंबर २००१, हा एक काळाकुट्ट दिवस.. अखेर उत्क्रांती काय, भोगलोलूपतेपोटी, किंवा ऐहिक सुखांमागे धावण्यापुरतीच असते?

त्यापेक्षा जंगली, हिंस्र श्वापद बरी.. त्यांच्यांतसुद्धा एक केवळ क्षुधासंतोषी शिस्त असते..सूड वगैरे अभावानच दिसतो.. त्यांचं आक्रमण केवळ भीतीपोटी आणि स्वसंरक्षणापोटीच असतं.. पण, धर्मगुरूंनी दाखविलेली शांततामय सहजीवनाची दिशा, माणुसकीची शिकवण, सर्वसामान्य माणसांसारखा जन्मलेल्या, वाढलेल्या अमानुषांचा समूह, सूडग्रस्त मानसिकता आणि अधर्मांधता या दोन अवगुणांनी पूर्णपणे झाकोळत, जेंव्हा अशी कृत्य करायला सरसावतो, धजावतो, तेंव्हा माणसांतलं पशुत्व शोधण्यापेक्षा, त्या मागची कारणं शोधणं आवश्यक वाटायला लागतं.

World Trade Center नावाच्या, अमेरिकेच्या अनेक मानबिंदूंपैकी एक, अशा या इमारतींवर, ९ सप्टेंबर २००१, अमेरिकेंत, सुरक्षाव्यवस्थेला पाचारण करण्यासाठी वापरतांत तो क्रमांक, ९/११, या एका सर्वसामान्य सकाळी कांही क्षणांच्या अंतरानं दोन प्रवासी वायुयानं धडकली.. चालक होते.. स्वप्राणाहुती अर्पणोत्सुक, बिन लादेनच्या

आत्मघातकी पथकांतले अतिरेकी.. कडक सुरक्षा व्यवस्थेचे धिंडवडे काढीत, Men in black च्या तीक्ष्ण नजरांच जाळ भेदीत.. प्रवाशांमधे बेमालूम मिसळत, घुसलेले..

रोजी रोटी कमावण्यासाठी, रोजच्या सारखं, कुटुंबातल्या अबालवृद्धांचा निरोप घेवून वाहेर पडलेल्या कर्त्या-धर्त्या हजारो नरनारींची स्वप्न अक्षरशः धुळीला मिळाली त्या सकाळी..

कांही निमिषार्धांत..

पण.. खरखरं अद्‌भुत तर पुढेच आहे.. हे वाचा आणि उरांत, मनांत खोलवर रुजवा, जोपासा.. ते आपलेया आयुष्यांतल्या भयाण, भीषण निराशाजनक अवस्थेंतून नुसतं बाहेरच काढणार नाही तर भयमुक्त करीत नवसंजीवनी देईल..

आपल्या सर्वांना, दुस-या महायुद्धांत, संसुक्त फौजांनी, हिरोशिमा-नागासाकीवर केलेल्या अणुबॉंब हल्ल्यानंतर, बेचिराख झाल्यावर सुद्धा, कांही वर्षांतच, अथक् परिश्रमानं, परत पंख उभारून, झेप घेत, जगाच्या नकाशावर एक प्रगत देश म्हणून नांव कोरणारा जपान सुपरिचित आहे..

हे या छायाचित्रांत तसंच कांहीस असणारं, अपकृत्याची चीड, संताप, उद्वेग मनांत खदखदत असतांनासुद्दा, या हल्ल्यांत नाहक बळी गेलेल्या सहस्रावधी नागरिकांविषयी हळहल, करुणा, कृतज्ञता. संवेदना, सहानुभूती या सर्व भावनांच एकत्रित दर्शन घडविणारं स्मारक आहे..अतिरेक्यांनी उध्वस्त केलेल्या, वर्ल्ड् ट्रेड् सेंटर् च्या अवशेषांतून साकारलेलं.. त्या स्मारकाचं नांव आहे,,

यू एस् एस् न्यूयॉर्क्

अविस्मरणीय, अप्रतिम, अविश्वसनीय...

२४००० सहस्र किलो भग्नावशेषांतून हे, नव्या धर्तीच्या युद्धनौकाप्रकारांतलं पांचवं अवाढव्य जहाज बांधण्यांत आलं. आणि त्याचं कामही त्याच्या कणाकणांतून वाहाणा-या कर्तव्यपूर्तीच्या स्रोताचं प्रतिनिधित्व करणारं.. अतिरेकी विरोधी सुरक्षा..

या जहाजावर ३६० नाविक आणि ७०० शस्त्र-सज्ज, प्रतिकार आणि परिमार्जन कुशल नौसैनिक जवान, त्यांच्या जलयानं आणि आक्रमक, वेगवान जलवाहनांसह, कायम स्वरूपी तैनात असतील

लॉसेंजिलिस् राज्यांतल्या अँमाइट् मधल्या एका, भव्य बद्ध पोलाद-ओतशाळेंत, या भगनावशेषांमधले सगळे लोखंडी अवशेष वितळविण्यात आले.

आणि यातून साकारला गेला या नौकेच्या मुख्य आधाराचा कणा, ज्याला KEEL, म्हणतांत जहाज-बांधणी तंत्रज्ञानांत.

९ सप्टेंबर २००९ या दिवशी जेंव्हा, साच्यामधे, वितळलेलं पोलाद ओतलं जात होतं, तेंव्हा, तिथे उपस्थित असलेल्या, अमेरिकन नौदलाच्या कॅप्टन् केविन् वेन्सिंग् नं वर्णन केल्यानुसार, त्या ओतशाळेंतले उंचेपुरे बलाढ्य शरीराचे कामगार, कर्मचारी, पांपणीकांठावरचे अश्रु कसेबसे आवरत ती प्रक्रिया, अत्यंत श्रद्धापूर्वक अंतःकरणानं न्याहाळत होते. त्या सर्वांसाठी ती एक आंतरात्मिक जाणिवेची, कांहीतरी महत्वाची खूणगांठ बांधण्याची घटिका होती..

मी जेंव्हा, ओतशाळेंतून आलेल्या त्या पोलादाला स्पर्श केला, तेव्हा माझं सर्वांग शहारून गेलं एका वर्णन करण्यापलीकडच्या, विलक्षण जाणिवेनं.. ओतशाळेचे प्रक्रिया प्रमुख व्यवस्थापक ज्युनिअर् शेवर्स सांगत होते. त्याच्या, नौदलाची, सुसज्ज अशी एक युद्धनौका या अस्तित्वापलीकडे असा एक वेगळा आयाम आणि किती महदार्थ निगडित होता याची आम्हां सर्वांना पुरेपूर जाण होतं होती क्षणोक्षणी..

त्यांनी आम्हाला तात्पुरतं बेसावध गाठलं असेल कदाचित, पण आम्हाला ते चितपट, किंवा पूर्णपणे नेस्तनाबूत कधीच करूं शकणार नाहीत..आम्ही परतलो आहोंत.. पूर्ण क्षमतेनिशी..

या जल-पदार्पण केलेल्या विलक्षण स्मरकाचं बोधवाक्य आहे..

'Never Forget'

***

# दशसूत्री

उत्तिष्ठ, जागृत, प्राप्यवरान्निबोधित

कधीकधी आपल्याला खूप थकल्यासारखं, गळून गेल्यासारखं, किंवा उदास, एकलकोंडं वगैरे वाटायला लागतं. पण तसं वाटलं तरी काळजी करण्यासारखं कांही नसतं त्यांत. हे सगळं जगण्याचा, जिवंतपणाचा भाग असतो.. एवढंच नव्हे तर ते सगळं म्हणजे जिवंतपणाचा पुरावासुद्धा असतो. कारण, मी मागं एकदा नमूद केलय तसं..

सुखं वाटावी घरोघरी

दुःख आपल्या गांठीच बरी..

त्यामुळं आपण ते ओझं वागवत हिंडत असतो आणि स्वतःला उदासवाणं, केविलवाणं करून घेत असतो वारंवार..आयुष्य लाटांसारखं असतं. त्यामुळं त्याला चढ-उतार अर्थातच असतांत.. कधी पुळणीवर लोळणं तर कधी नभाकडे झेप.. नाही कां.. कुठे आणि कुणाचं जिणं चढ-उताराविणा आहे.. अगदी रावा पासून रंका पर्यंत.. सगळयांचीच एक गत.. सुटका नाहीच.. कितीही किंमत मोजा..

कधीकधी असं वाटत असेल तुम्हाला, की आतां मनाची उभारी, उदासी झटकून कामाला लागणं वगैरे अशक्यप्राय गोष्टी आहेत. पण असं वाटलं तरी खचून जावू नका, कारण असे तुम्ही एकटेच नाही आहांत.. आपण सगळेच समवेदनांकित आहोत.

जोएल् सिम्स् म्हणतांत की, माझ्या अनेक वर्षांच्या अनुभवांतून आणि अभ्यासांतून, मी अश्या निराशाजनक क्षणांमधून बाहेर कसं पडायचं याचं एक तंत्र विकसित केलं आहे. मी परत उभारी घेवून, ऊर्ध्वगतिशील आणि क्रियारत व्हायला शिकलो आहे.

तर..

उत्तिष्ठ, जागृत, प्राप्यवरान्निबोधित

हे ते दहा उपाय..

लक्षांत ठेवा ही एक तात्पुरती अवस्था असते. प्रत्येक नाण्याला दोन बाजू असतात. तुम्ही सद्धा या नाण्याच्या खालच्या बाजूला पाहता आहांत असं समजा.

पण याचा अर्थ असा थोडाच आहे की त्याला वरची बाजूच नाही तुमची चलनगती आणि प्रेरणाबल जेंव्हा मंद वाटेल तुम्हाला, तेंव्हा तुमच्या राखीव ऊर्जेची गुंतवणूक करा आणि परिस्थिती बदलत असल्याची जाणीव अल्पकाळांतच तुम्हाला व्हायला लागेल. जिवावर आलेलं असतांना सुद्धा उठा आणि मस्त फेरफटका मारून या. थकलांत तर कुणा मित्राला दूरध्वनी करा. पहा तुमचा उत्साह आणि उमेद परतते की नाही तें..

आपली एक भ्रामक समजूत असते की, आपल्या जिवाला तेंव्हाच बरं वाटतं, जेंव्हा कांहीतरी भरघोस वैयक्तिक लाभ होतो. पण खरं तर तसं नसतं. पहिलं एक पाऊल पुढे टाकून बघा तर खरं..मग पुढचं. आणि मग हळूहळू अंतरं कापत वाटचाल सुरू करायची.. सुरू ठेवायची..

ज्या दिवशी चित्तवृत्ती उल्हसित नसतील, त्या ताळयावर आणायच्या असतील त्या दिवशी. सुरुवात करा थोड्याश्या व्यायामानं किंवा, रोजच्या आन्हिकांच्या निमित्तानं शारीर हालचालीनं

मग आपोआपच तुम्ही स्वतःला बजाऊ धजाल.. त्या काशीनाथ घाणेकरांनी गायलेल्या चित्रपटगीतांतल्या सारखं..

झटकून टाक जीवा दुबळेपणा मनाचा

आणि चमत्कार झाल्यासारखं, हळूहळू तुमची व्यायामाची गोडी वाढायला लागेल अन् वृत्ती तजेलदार, प्रफुल्लित होतील..मनोगतींला एक प्रकारची प्रेरणा मिळेल..

आणि हे करीत असतांना एका वेळी एकच उद्दिष्ट किंवा ध्येय ठेवा, आणि त्यावरच लक्ष केंन्द्रित करा.

कारण कधी कधी,

कामे पडली अनंत, वेळ मात्र मर्यादित

असं म्हणत, आपण एकाच वेळी अनेकविध कामांचा विचार, प्रक्रिया, कृती यामधे गुंतल्यावर,

एक ना धड, भाराभर चिंध्या

या (अ)न्यायानं बोजवारा उडतो आणि मग मनाचिये गुंथी गंफियेला शेला तितरभितर होतो, बिघडतो, आणि थकवा जाणवायला लागतो..आपणच ओढवून घेतलेला, शिंगरू मेलं हेलपाट्यानं.. तसं..

कांही विशेष नसतं बरं कां हे.. अगदी सग्गळयांच्या बाबतींत, हे कधीना कधीतरी घडतचं...

या सगळयावरचा एक जालीम उपाय म्हणजे, एकावेळी एकाच प्रकल्पावर काम करा. शांतपणे आणि उत्तम रीतीनं तो पार पाडा. त्या यशामुळं आपोआपच, तुमचा उत्साह

द्विगुणित होईल आणि तो ऊर्जास्रोत तुम्हाला पुढच्या प्रकल्पाला पुरेसा उत्साह, उमेद, बल.. पुरवेल.

नाउमेदीच्या अशा काळांत, जिथं कांही सकारात्मक काम, समारंभ सुरू आहे अशा एखाद्या मित्राकडे, आप्तस्वकीयाकडे गेलांत तर तुमच्या मनाची जड अवस्था नकळत गळून पडेल आणि हलकं वाटायला लागेल. काळजी एकच घ्या की ज्या स्नेह्या किंवा आप्ताकडे जाल, तो स्वतः उमद्या स्वभावाचा आणि अगदी आगंतुक म्हणून गेलांत तरी स्वागतोत्सुक असायला हवा. नाहीतर त्याचा आंबट चेहेरा बघून तुमचं तोंड आणखी कडू व्हायचं..

आणि मदत मागा.. संकोच कसला करता.. अशा क्षणी निकटवर्तियांनीच एकमेकांचे ऊर्जास्रोत व्हायचं असतं..महाजालांतल्या एखाद्या संकेतस्थळांतूनसुद्धा मित्रत्वचे, सुखदायी सल्ले मिळून जातांत कधीकधी..अवलंब करून बघायला काय हरकत आहे..

नाउमेदी अवस्थेंत, नकळत मन सुद्धा नकारात्मक विचार करायला लागतं. आणि हेच कधीकधी तुमच्या निरुत्साहाच मूळ कारण होतं. विचारांची गाडी रुळावर आणा आणि विचारप्रवाहाला अशा ठिकाणी वळवा की जिथं उतार.. आणि उतारा सुद्धा.. मिळेल आणि आपोआपच गतिमानता प्राप्त होईल..

स्वतःचा स्वतःशी संवाद वाढवा अगदी अंतर्मनांत वादावादी, संघर्ष झाला तरी चालेल.. घर्षण देत ऊर्जेला जन्म..आणि फेकून देतं गारठा.. आखडलेपण..

“मी हे नाही करू शकत” पेक्षा, “पहाच तुम्ही मी कसं पैलतिराला लावतो तारू”, असं म्हणत रहा..

उत्तिष्ठ, जागृत, प्राप्यवरान्निबोधित

आपण, नकारात्मकतेच्या व्याधींतून बाहेर पडण्याच्या, पांच सोप्या युक्त्या दृष्टीपथांत आणल्या, त्यांची दखल घेतली..

आज ऊर्वरित पांच उपाय, उपचारांचा विचार करूं..

६..राहून गेलेल्या आणि करण निकडीचं असलेल्या कामांची यादी, स्मरणपत्र म्हणा हवं तर.. जमेल तिथं, घरांत जागोजागी, लावा. येताजाता तुमच्या नजरेस ती वारंवार पडेल याची काळजी.. नाही नाही, खात्री वाटली पाहिजे. जेवणाचं मेज, शीतपेटी, आरसा, बेसिन वरचा, कपाटावरचा, प्रसाधन मेजावरचा.. ज्याला आपण मराठींत, ड्रेसिंग् टेबल् म्हणतो.. दरवाजामागे, पुढे. वाहनाचं इप्सित-स्थल-मार्गक्रमण-सुविधा चक्र.. म्हणजे आपलं स्टिअरिंग् व्हील् हो... अशा या कांही जागा तुम्हाला, सहज सुचल्या म्हणून सांगतोय.. कारण नजरेआड ते मनापल्याड गेलंच म्हणून समजा.. म्हणून हा खटाटोप. कामं ठेवा नजरेसमोर अन् वावरा बिनघोर.. जोडीला, गंमत म्हणून, ती कामं व्हायच्या आधी आणि नंतर तुमचा चेहेरा, अनुक्रमे, कसा होता आणि होईल हे दर्शविणारी व्यंगचित्र लावा..पहा ती तुम्हाला आपोआप उत्तेजना देतांना तुमच्या ओठांवर एक हलकी स्मितरेषा फुलवतांत की नाही ते..

७..मित्रमंडळींबरोबर कुटुंबियांसमवेत, तुमच्या, नजीकच्या भविष्यांतल्या उद्दिष्टांबद्दल सतत चर्चा. निचार विनिमय, सल्लामसलत सुरू ठेवा.. हेतू जाहीर करा..त्यामुळं आपोआपच तुम्हाला ते साध्य करण्याच्या जबाबदारीची जाणीव व्हायला लागेलं, आणि त्या दिशेनं तुम्ही वाटचाल करूं लागाल. स्वतःबरोबर एक कार्यपूर्तता-काल-दर्शक करार करा, त्याच्या प्रती मित्रमंडळी कुटुंबिय यांना किंवा अन्य कोणीही, जे तुमचा उत्साह वृद्धिंगत करूं इच्छितांत, अशा सर्वांना वाटा. त्यापैकी झालेल्या कामांबद्दल, त्यांना मधूनमधून कल्पना द्या, अभिप्राय घ्या.. आणि कार्यपूर्तीसाठी स्वतःलाच कालमर्यादेचं रिंगण आखून द्या.

८. स्वतःच्या नाउमेदीला कुरवाळत बसूं नका. जेंव्हा जेंव्हा निरुत्साही वाटेल, तेंव्हा तेंव्हा त्या जाणिवेला लगाम घाला.

सर्वसामान्यतः, ही एक सवय असते की आपले प्रश्न सुटण्यात अडचणी येत असतील किंवा उत्तर मिळत नसेल तर त्या प्रश्नाच्यामानानं आपण स्वतःला अल्पकुवतधारक समजायला लागतो.

हा अनुभव आपणापैकी बहुतेक सर्वांनी कधी ना कधीतरी घेतलेला असतो.

त्यावर तोडगा म्हणजे..

मनातल्या नकारात्मकतेला तीलांजली देवून, त्यांच्या जागी सकारात्मकतेच्या बीजांची पेरणी करा. स्वतःला बजावा की हे प्रश्न आपल्याला वाटतायत त्यामानानं खूपच क्षुल्लक आहेत.

उदाहरणार्थ, मला हे कसं जमणार.. मी यांतनं कसा बाहेर येणार.. असं रडत बसण्याऐवजी, हे करणं मला अत्यंत आवश्यक आहे.. एकावेळी एक अशा छोट्याछोट्या क्लृत्या शोधत मी ते कसंही करून मिळवेनच.. असं घोकत रहा.

९.. दीर्घ श्वास घ्या.. रात्री शांत झोप घ्या.. सकाळी उठून आन्हिकं उरकल्यावर एक छानपैकी Shower घ्या.

आणखी एक युक्ती माहीत आहे.. ब-याच वेळा कामास येते प्रातःकालीन वैचारिक गोधळांत..

आदल्या रात्री, मेंदूची नैराश्यदायी विचारांनी चाळण केली असताना, पोटाच्या स्नायूंची, श्वासाबरोबर, संथपणे, आंतबाहेर हालचाल करीत, योग सदृश व्यायाम करा. म्हणत रहा.. मी आता यानंतर मस्त ताणून देणार आहे. पूर्ण विश्रांती घेतल्यावरच उठणार आहे. उद्या जागं होतांना, या उद्वेगजनक मनावस्थेंतून बाहेर पडण्यासाठी आवश्यक अशी अवस्था प्राप्त करण्यासाठी, मी प्रसन्न, ताजातवाना आणि उत्साही, गतीशील मानसिकता घेवून डोळे उघडलेले असेन. मग स्नानासाठी अंगाला जलधारांचा स्पर्श झाला की हळूहळू आपोआपच विचारांना सकारात्मकता, अडचणींतून सुटकेचं तंत्र, समोर उभ्या ठाकलेल्या प्रश्नांची उत्तरं.. सगळं माझ्याकडूनच प्राप्त होईल..

हे सगळं अनुभवा, आणि कोडी सुटल्यावर आणि कोंडी फुटल्यावर हा मंत्र तुमच्या मनोव्याधिग्रस्त आप्तेष्ट, मित्र-मैत्रिणींना देवून त्यांचा दुवा घ्या

१०.. वाणीची, उच्चाराची शक्ती, ताकद, बल फार मोठं असतं. मरा मरा, हे म्हणता म्हणता वाल्या कोळयाचा वाल्मिकी झालाच की नाही...शब्दांच्या, वाक्यांच्या, साध्यासाध्या उच्चारांत, अनुक्रमे अक्षरांवरच्या, शब्दांवरच्या आघातांवर बदल करून बघा.. दूर जाणारा एखादा मागे वळून पाहांत जसा परत फिरतो तश्या सकारात्मक संधी तुमच्या भवती आपोआप गोळा व्हायला लागतील.

अडचणींच्या विचारांभवती रुंजी घालण्यांत, त्यांना कुरवाळण्यांत अमुल्य वेळ दवडण्यापेक्षा, लाभाचे हिशेब करीत वृद्धीची गणितं मांडण्यांत व्यस्त रहा..

या छोट्याछोट्या बाबी तुमच्च्यांतल्या नकारात्मकतेला बाहेरचा रस्ता दाखवितांना, सकारात्मकता रुजवतील आणि तुम्ही, नाइलाजानं, नकळत जोपासत असलेली स्थितिप्रियता लोप पावून, ती गतिशीलतेंत, उपक्रमशीलतेत परीवर्तित होईल.

तुमची विचारशक्ती हे एक कसब असल्याप्रमाणे तुम्ही जोपासत रहा, कुशाग्रता वाढवा, आणि त्यांवर स्वर व्हा एखाद्या कुशल योद्ध्या सारखे. तुमचा सकारात्मक प्रवेग वाढल्यावर तुमची ऊर्जा आपोआपच पुनरुज्जीवित होइल आणि तुम्ही तुमच्या मनाचा, वागणुकींतला तोल सहजगत्या पुनर्प्राप्त कराल..

..इति

******

# चार जुलै १९८१

हो.. चार जुलै १९८१ हाच दिवस.. कारण याच दिवशी, लंडनमधे विंबल्डन अंतिम सामन्यांत जॉह्न मॅकॅन्रोनं बिऑं बोर्गला हरवून पहिलं विजेतेपद मिळवलं..

एका बाजूला बोर्गरूपी धीरगंभीर अथांग सागर आणि समोर, किना-यावर आदळणा-या अवखळ, उच्श्रृंखल लाटांच्या जलधीसम जॉह्न उद्धट, उर्मट संतापी, भांडखोर

पण मी तुम्हाला कां सांगतोय हे सगळं ?

कारण त्या दिवशी त्याच वेळी मी पुण्यांत राष्ट्रीय चित्रपट आणि दूरदर्शन प्रशिक्षण केंन्द्राच्या कलागारांत गीतरामायणाचं ध्वनिचित्रमुद्रण करीत होतो. स्वतः बाबूजी गात होते. मुद्रण मधेच कांही कारणानं थांबतांच प्रश्न आला.. 'काय स्कोअर् झाला हो..? कोण पुढे आहे..?' एक लक्ष जरी तिकडं होतं बाबूजींचं तरी शब्दप्रभू गदिमा विरचित प्रत्येक प्रसंग गीतांत शब्दोच्चार, स्वरांचा लगाव, भाव यांत तसूभरही फरक नाही.. पंचवीस वर्षं तेच सातत्य..तीच निष्ठा अबाधित.. केवळ अविश्वसनीय,

मुद्रण आहे मजकडे ! उपलब्ध..ऐकाल तर थक्क व्हाल..

१९८०-८१ हे गीतरामायणाच्या प्रसारणाचं रजतजयंती वर्ष होतं. त्या निमित्त पुण्यांतल्या टिळकरस्त्यावरच्या एका मैदानावर भव्य समारंभांत बाबूजी गाणार होते. त्याच चित्रमुद्रण दूरदर्शननं केलं १६मीमी फिल्मवर. पण प्रसारणवळी ओठांची हालचाल आणि ध्वनि यांचा मेळ जुळेना. कांहीतरी तांत्रिक कारण होतं. मग त्यांतली निवडक बारा..सहा मराठी आणि सहा अन्य भाषिक..(उपेंद्र भट, कानडी.. सौ. भागवत, गुजराथी वगैरे) एफ् टी आय् आय् च्या कलागारांत करायचं ठरलं आणि माझ्यावर ती जबाबदारी टाकण्यांत आली.

मोठ्या कलागारांत भव्य नेपथ्य़ उभारण्यांत आलं, आणि बहुछायक पद्धतीनं तीन दिवस मुद्रण झालं.. त्या वेळची ही आठवण..

तसा बाबूजींचा आणि माझा परिचय, अर्थांत श्रीधरमुळं. ७२ मधे दूरदर्शनच्या सुरुवातीच्या काळांत, युवदर्शनकरिता श्रीधरनं गाणी केली होती. त्या निमित्त घरी जाणं व्हायचं आणि सुधीर फडके नामक विभूतीचं दर्शन घडायचं..नंतर कांही वर्षांनी योग आला प्रतिभा आणि प्रतिमा साठी असे गीत जन्मा येते या कार्यक्रमाच्या निर्मितीवेळी..

त्या 'असे गीत...' कार्यक्रमासाठी, तिथल्यातिथं रचना करणारा सिद्धहस्त, शब्दकुबेर, कवी आणि तितकाच सिद्ध-स्वर संगीतकार अशी जोडी शोधणं सुरू झालं. माझ्या डोळयासमोर पहिल नांव आल ते बाबूजींच. कारण त्यांनी गीतरामायणासाठी अशा पद्धतीनं तात्काळ पण अत्यंत समर्पक चाली दिल्याची माहिती होती. तेंव्हा संगीत काराचा शोध लागला, बाबूजींना विनंती केल्यावर त्यांनी लगेच होकारही भरला...कारण त्या काळी सगळयाच प्रथितयशांना हे माध्यम नवीन होतं आणि त्यामधे कांहीतरी प्रयोग करून पाहाण्याची उत्सुकताही होती. मग, कविवर्य गदिमांच नांव, अर्थात ओघानंच आलं, रसिकमान्य

रचनाकार म्हणून. या दोघांबरोबर, कार्यक्रमादरम्यान संवाद साधण्यासाठी, संवाद क त्याच तोडीचा असण आवश्यक होतं. अशावेळी, या दोन्ही दिग्गजांशी, वैचारिकपेक्षा सांस्कृतिक जवळीक असणारे...कारण अण्णा कॉंग्रेसी, तर बाबूजी पक्के संघीय आणि जनसंघीय आणि ज्यांच्या नावाचा विचार चाल्लावृता ते स्वत:ला समाजवादी म्हणवून घेणारे...असे एकमेव, महाराष्ट्राचं लाडकं व्यक्तिमत्व ठरू पाहाणारे, पु.ल. देशपांडे यांच्या नावावर शिक्कामोर्तब झालं. पुलंनीही कुठलेही आढेवेढे न घेता...पुलंना कुठे ताणायच किंवा कुठे सैल सोडायचं ते आणि या माध्यमाची बलस्थानं बरोब्बर माहिती होती त्यामुळं...हो म्हटलं.

पाहाता पाहाता, महाराष्ट्राची तीन अग्रणी, त्यांच्या त्यांच्या कलाक्षेत्रांत जनमान्यता मिळविलेली 'नक्षत्रं', दूरदर्शनच्या कॅमेऱ्यांसमोर प्रविष्ट झाली.

कार्यक्रम, जुजबी तालिमीनंतर सुरू झाला. पुलंनी कार्यक्रमाची संकल्पना आणि पूर्वपीठिका, खास त्यांच्या शैलीत सांगितल्यावर थोडया गप्पा दोघांबरोबर मारून, काव्यरचनेसाठी पुढची सूत्र, अण्णांकदे सोपविली. अण्णांनी क्षणभर पुल आणि बाबूजींकडे स्मितभरल्या नजरेनं पाहात, समोर ठेवलेलं पानाचं तबक हळूच जवळ ओढलं. त्यांतलं एक हिरवंगार पान हातांत घेवून, त्याच्याकडे पाहाणाऱ्या कवि्वर्यांच्या ओठांतून, उस्फूर्तपणे छंदोबद्ध काव्यपंक्ती झरायला लगल्या...

'हळुवार नखलिले पान...हळुवार नखलिले पान...' आंणि स्वत:च नकळत त्यांनी, सुचलेल्या कल्पनेला, शब्दांना दाद दिली, 'आहाहा ! नखलिले...काय छान शब्द आहे...' आणि इतकी उत्स्फूर्त कविता ऐकून, तितक्याच तांतडीनं सुरावट न सुचली तर ते बाबूजी

कसले...त्यांनी तिथल्या तिथ इतकी अप्रतिम चाल केली की...क्या बात है ! खूपच गाजला तो कार्यक्रम...आणि संकल्पनाही दाद घेवून गेली...

ते ,शब्दप्रभु गदिमांनी 'जन्माला' घातलेले 'असे गीत' , तुमच्या भेटीसाठी उधृत करतोय् आज...

हळूवार नखलिले फूल ,त्यातून उसळली भूल
मी वेडी जाणत  नव्हते ,ते फूल अफूचे होते !

अंधाऱ्या रात्री कुठले, लाल मणी चमकुन उठले
मी वेडी जाणत नव्हते ,ते नाग जागते होते !

थबकून राहिले डोळे ,पाहून मधाचे पोळे
मी वेडी जाणत नव्हते ,ते कोष विषाचे होते !

ये खळाळूनिया पाणी ,मज गमे येइ जलराणी
मी वेडीजाणत नव्हते, ते रूप पुराचे होते !

बाबूजींनी नंतर ते गायलं, तिथल्यातिथं स्वर-रचना करून...आणि त्या गीताच्या जन्माच्या, त्या देदीप्यमान प्रवासाचे आम्ही सगळे साक्षीदार झालो होतो, केवळ आमच्या 'दूरदर्शन'मधल्या नेमणुकांमुळे, आणि गुरु केशव केळकरांच्या संकल्पनेमुळे. आज मागे वळून बघतांना वाटतं...

तेंव्हा लग्न व्हायचं होतं, आता नात- नातू आहे
नांव असणं आणि नांव ’होणं’, या मधला, ’दूरदर्शन’ सेतू आहे...

१६मिमि, reversal-sepmag, ते Digital Video पर्यंत, स्थित्यंतर
Cut-spice, Pause-release, आणि आता Non-linear....

कवि, साहित्यिक, वैज्ञानिक, वादक आणि गायक
’दूरदर्शन’नं नवारूपाला आणलेले, रंगनायिका आणि नायक...

छोट्या Idiot-Box मधून, पोहोचलो घराघरांत,
खिडकी मधून ’जग’ रुजलं, तनांत मनांत आणि जनांत...

आम्ही आपलं आजपर्यंत खेळलो Copy-book
सवंग प्रसिद्धीच्या मागे लागण्याची मात्र, केली नाही चूक...

भक्ती, सुहासिनी, केळकर, दिवेकर आणि पारकर
आठवणींच्या डोहांत डोकावतांना, डोळयांत साकळतो गहिवर...

’चांगुणा’ नि,’कस्तुरबा’ची ’सासू’ झाली, काय होतय कळत नाही
अती झालं त्याचं आता, हसू मात्र आवरत नाही...

माहिती, ज्ञान, मनोरंजन, असा आम्ही शिकलो क्रम
पडलोय अडगळीत आता, म्हणतांत, "याला झालाय् भ्रम.."...

वाहिन्यांची ’मातीमाय’ ’दूरदर्शन’ वय चाळीस
आमचा ’पत्ता’ ? ’कटत’ नाय् तोवर,’
वरळी, मुबै’ पंचवीस’...’वरळी, मुबै’ पंचवीस...

--------------------------------

# राष्ट्रीय सवयी.. अंगवळणी पडलेल्या

एक भारतीय म्हणून आपल्या सर्वांना असलेल्या राष्ट्रीय सवयी.. अंगवळणी पडलेल्या..

आणि मी सुद्धा त्याला अपवाद नाही.. नसावा बहुधा !!

१..शांपूच्या बाटलींतल्या संपृक्त द्रावानं तळ गाठला, की आम्ही त्या बाटलींत थोडं पाणी घालून, ते विसळून, पुनःपुन्हा वापरतो. काय करणार.?. कांटकसर अंगवळणी पडलिये नां..!

२..दंतमंजनार्थ मलम..Paste.. तेंव्हाच आम्ही संपलं असं म्हणतो, जेंव्हा, पत्र्याचं आच्छादन पिळून, खालपासून वर पर्यंत गुंडाळून सुद्धा त्यांतून कांहीही फलित मिळत नाही तेंव्हा !

३..मी जेंव्हा भाजी बाजारांत जावून, १००/१५० रुपयांची भाजी खरेदी करतो, तेंव्ह त्या भाजीवाल्या/ली कडे, आल्याचा तुकडा, कोथिंबिरीच्या..दोन कां होईना.. कांड्या, कढीपत्ता आणि एकदोन मिरच्या, 'तशाच', म्हणजे 'फुकट', पिशवींत टाक अशी मागणी करतो.. तो मसाला माझ्या जन्मसिद्ध हक्काचा असल्या सारखा..

४..मला कांही कारणानं, समारंभांत, आप्तेष्ट, स्नेही आदी मंडळींनी, प्रेमादरानं दिलेल्या भेट वस्तू, मी संधी मिळतांच, कुणा नवपरिचिताला, किंवा माझ्यासाठी फारशा महत्वाच्या नसलेल्या  व्यक्तीला, त्याच्याकडच्या आमंत्रणानंतर, नाइलाजानं, नाखुषीनं जावून, व्यवस्थीत पुख्खा झोडून (नाइ'लाजा'नं ?), मजकडून भेट म्हणून प्रदान करतो. आणि माझ्या

निर्लज्जपणाचा कळस, कहर म्हणजे, मी त्या मिळालेल्या भेटवस्तूचा चकचकीत आच्छादन-कागदसुद्धा पुनर्वापर करींत, कांटकसरीच्या संस्कारांची बूज राखतो.

५..शोभेच्या वस्तू ठेवायच्या, कांचांची पारदर्शक दारं असलेल्या कपांटांत आलेल्या पाहुण्यानं डोकावून, त्यांतल्या, मी हौसेनं खरिदलेल्या चिनी मातीच्या, कषाय-पेय-धारक-संचाचं कौतुक करून, किंमत विचारली, की मी मनोमन सुखावून, खरिदल्या किमतीच्या दीडदोनपट बढाके दाम सांगतो. पण त्या पाहुण्याला हे माहीत नसतं की मी स्वतः त्यांतून चहा-कॉफी वगैरे कधीच पीत नाही. हाः..हाः..हाः.. फुटलं तर नुस्कानी नको रे बाबा..

६..घरांत कांही कार्य आहे.. अलंकार घडवून पत्नीला सुखावून, तिचं कौतुक भरलं स्मितहास्य झेलंत, कसचं, कसचं म्हणत मान ताठ करायची आहे. तेयासाठी सराफकट्ट्यावर जावून सुवर्ण  खरेदी करायची आहे.. असं कांही नसतांनासुद्धा मी सोन्याच्या आजच्या भावाची चिंता करीत बसतो.

७..माझ्या चित्रवाणीसंचाचा, किंवा दृक्श्राव्य-तबकडी-दर्शकाचा दूरनियंत्रक.. म्हणजे Remote हो.. जेव्हा मला सहकार्य करेनासा होतो, तेंव्हा मी तो, खिळखिळा होईस्तो, सर्व बाजूंनी ठोकतो, आपटतो, उघडून, उगाचाच, त्यातलं तंत्रज्ञान अवगत असल्याच्या आविर्भावांत, त्यांत पारंगत असल्यासारखा आंतले भाग उचकटत बसतो, पण साधी गोष्ट की त्याचा ऊर्जा स्त्रोतसंच..Battery of cells..बदलला पाहिजे हे माझ्या लक्षांत येत नाही, किंवा लक्षांत येऊनसुद्धा अवलंबकृती करीत नाही.. खिशांतले चार चव्वल खर्ची पडतील म्हणून..

८..कधीकाळी, बायको-मुलांनी फारच हट्ट केला तर.. म्हणजे मुलांचा हट्ट आणि भार्येचं डोळे वट्टारणं.. चौपाटीवर जावून भेळ-पाणीपुरी खायचा बेत करतोसुद्धा मी, बरंका,, पण पाणीपुरी खावून झाल्यावर, दोनचार डाव मसाल्यांचं पाणी ढोसल्यावर, हायहुई करीत, तिखट लागलं म्हणून, भेळवाल्या भय्याकडे, साधी कोरडी पुरी, फुकट मागायची सवयच लागली आहे मला एका साध्या पुरीचे कुणी पैसे देतं कां सांगा बरं मला... आणि जर कां भैयानं ती नाकारली तर मात्र माझ्या तळपायाची आग मस्तकांत जाते, मी बरोबरच्या कुटुंबियांना

शरमेनं मान खाली घालावीशी वाटेल, अशा पद्धतीनं आकांडतांडव करतो.. आजूबाजूला गर्दी जमेस्तो..

९..कुणाकडचं, दुपारच्या भोजनाचं जर निमंत्रण मिळालं मला, तर यजमानाला, अतिथी पूर्ण समाधानानं भरपूर, यथेचित जेवला हे समाधान मिळावं या प्रमाणिक आणि शुद्ध हेतूनं, त्यादिवशीच्या सकळच्या नाश्त्याला फाटा देतो, नि जवळजवळ उपाशीपोटी पोहोचतो इप्सित स्थळी..

१०..माझे सदरे, जुने दिसायला लागल्यावर, मी ते शय्याभूषा म्हणून वापरायला सुरुवात करतो. ते आणखी जुने वाटायला लागल्यावर, मी, खास होळी, धुळवड, रंगपंचमीसाठी म्हणून, बासनांत बांधून ठेवतो.दोनचार वर्षांनी मग जेंव्हा ते फारच जीर्णशीर्ण दिसायला लागातांत, तेंव्हा, नाइलाजानं, अत्यंत जड अंतःकरणानं, पत्नीच्या हवाली करतो.. पोच्छ्या म्हणून वापरायला..

११..तसा पिझ्झाबिझ्झा घरपोच मागवायला मला जिवावरच येतं. पण काय करणार, मुलाबाळांसाठी करावं लागतं ना कधीकाळी, सठीसमाशी.. त्यांतल्या त्यात एक, माझ्या कांटकसरीच्या संस्कारांना पूरक गोष्ट म्हणजे, त्या वितरणकुमारांना, ‘वरदक्षिणा घ्यायला बंदी असते म्हणे.. मग मी खूप आग्रह करतो त्यांना प्रेमपूर्वक.. नशीब, घालून दिलेला नियम तोडणारा, त्यांतला एखादा भेटला नाहिये मला.. नाइतर पंचाईतच नां.. मग आतां तो अगदीच नाहा नाही म्हणतोय अशी खात्री झाल्यावर, मी कोडगेपणानं त्याच्या मागं लागून, चारपांच, आमचुरा आणि मीर्चीच्या भुकटीच्या पुड्या पदरांत पाडून घेतोच..

दुस-या दिवशी सकाळी, मॅगीवर छिडकून, ती आणखी चविष्ट करायला..

आणि...

छिद्रान्वेषी लोक कितीही आणि कांहीही म्हणोंत.. कांही गोष्टी म्हणजे, पुणेकरांची मक्तेदारी आहे असं मुळीच नाही हं..! उदाहरणार्थः

दुधाची प्लास्टिक् पिशवी विसळून ते पाणी, मूळ दुधांत मिसळणे, आदल्या दिवशीच्या पोळया कुस्करून, त्यांत तूप-साखर किंवा तूपगूळ घालून त्याचे छान लाडू करणे वगैरे.

हे सगळं तर आम्ही करतोच, पण तुम्हाला सांगतो, माझी आई दोन लाजवाब पदार्थ करायची.. छान, बिनडागाच्या, केळीच्या सालांची, डाळ घातलेली भाजी आणि वांगी, भोपळा, भेंड्या यांची देठं चिरून, त्यांत दही, तिखट, मीठ घालून केलेली देठी..

आम्ही उदबत्ती पाण्यात भिजवून लावतो.. जास्त वेळ टिकते..

अमृतांजनाच्या किमती वाढल्यापासून, कांही दुकानदारांनी उपलब्ध करून दिलेल्या सुविधेचा लाभ आम्ही, त्याला दुवा देत, घेतो.. म्हणजे, उघड्या बाटलींत बोट घालून त्याला लागलेलं अमृतांजन कपाळाला चोळून घ्यायचं.. फक्त एक रुपयांत..

हे सगळं आम्ही कां करतो..? विनोद निर्मिती करायची म्हणून.. ?

गैरसमज, मनांतून काढून टाका..! आज आमच्या सारख्या सर्वसामान्यानं, असा निगुतीनं संसार केला नाही, तर मरण्यासाठी विष विकत घ्ययलासुद्धा दमड्या उरणार नाहींत. जनहो..!!